**३६. वेदवाक्याच्या पदसामर्थ्यावरून हि (असें सिद्ध होतें.) (हे०)**

36. Again, (this is established) by the power of the terms of the Vedic text being evident. (Argument in support of the final statement.)

सोमेंद्र या देवतांस उद्देशून चरू अर्पण करायाचा तें कर्म. बौद्धाचार्य म्हणतातः–वैदिकाचार्य, तुम्ही वेदवाक्याच्या अर्थाचा संकोच कां करितां ? कोणत्या पाहिजे त्या प्रसंगीं आणि कोणी पाहिजे त्यानें हें कर्म करावें असा आमचा अभिप्राय आहे. जो कोणी सोमरस अधिक पिऊन ओकेल त्याला हें कर्म करण्याचा अधिकार आहे. वैदिक कर्म संबंधानेंच सोम पिण्याचा अधिकार ज्याला आहे त्यानें इष्टि करावी असें तुम्ही म्हणतां. कां होईना. ऋत्विजांसहि वैदिक कर्म करण्याचा अधिकार आहे व यजमानासहि वैदिक कर्म करण्याचा अधिकार आहे. मग कोणी ऋत्विज यजमानाचें कर्म चाललें असतां मध्येंच सोम पिऊन ओकला तर त्यानें स्वतंत्रपणें आपली इष्टि करावी. मग इकडे यजमान आपला सोमयज्ञ करतो आहे आणि मध्येंच एक ऋत्विज सोमरस अधिक पिऊन आपण ओकलों म्हणून सोमेंद्र इष्टि करतो आहे अशी वेदवाक्याच्या अर्थाची व्यवस्था करावी. एणेंकरून गोंधळ होईल.

What does it mean? It refers to the offering of boiled rice to be made to the gods Soma and Indra. The Bouddhâchârya asks: —"Vaidikâchârya, why do you restrict the sense of the Vedic text to be interpreted? I hold that the Vedic text sanctions an oblation of boiled rice to be offered by any body under any circumstances—any body who over-drinks *soma*. On the contrary, you state that the oblation of boiled rice is to be offered by him alone whom the Veda permits to celebrate a sacrifice. Let this be granted. Then all the officiating priests, as well as the sacrificer are permitted by the Veda to celebrate a sacrifice. Then as the sacrificer is performing his part of a sacrifice, some officiating priests may over-drink *Soma* and may thus have to perform the Vâruṇî-simple-sacrifice to escape the consequences of over-drinking *soma* and vomiting it. Then the interpretation of the Vedic text in question would be that when the *yajamâna* is engaged in the performance of the main sacrifice, a subordinate officiating priest can perform an independent simple-sacrifice for himself. Thus there would be confusion.

३५. वैदिकाचार्य म्हणतातः—बौद्धाचार्य, हें स्पष्टच आहे कीं, यज्ञामध्यें ऋत्विज गौण आहेत. मुख्य काय तो

35. The Vaidikâchârya observes:—"Bouddhâchârya, it is plain enough that in relation to a sacrifice, the officiating priests

सूत्राणि.

## आग्नेयाष्टाकपालस्यद्व्यवदानमात्रस्य होतव्यताधिकरणम् ॥

**सर्वप्रदानं हविषस्तदर्थत्वात् ॥ ३७ ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः** । सर्वं हविरग्नये प्रदातव्यं । कुतः । अग्नये तदिति वेदोक्तत्वात् ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यदाग्नेयोऽष्टाकपालोऽमावास्यायां च पौर्णमास्यां चाच्युतो भवति । तै० सं० ( २.६,३,३. ) ॥

**निरवदानात् तु शेषः स्यात् ॥ ३८ ॥ ( सि० ) ॥**

**भावार्थः** । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । सर्वस्य हविषो द्व्यवदानमात्रस्यैव वेदे निरूपणं स्पष्टं दृश्यते । तस्माद् द्व्यवदानमात्रस्य प्रधानत्वं । यदवशिष्टं तच्छेषः । निष्कृष्यावदानं निरवदानमिति शबरः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

द्विर्हविषोऽवद्यति । द्व्यवदानं जुहोति ॥

यजमान. मुख्याच्या संबंधानें वेदवाक्याचा अर्थ बसत असतां ओढाताण करून गौणाशीं त्याचा संबंध बसवूं नये. असा आम्हा मीमांसकांचा संप्रदाय आहे. म्हणून वैदिक कर्म करीत असतां यजमान जर सोमरस पिऊन ओकला तर त्यानें सौमेंद्र इष्टि करावी असा वेदवाक्याचा अर्थ आहे.

३६. जो सोमरस पिऊन ओकतो त्याचें कर्म बिघडतें. आणि सोमपानरूप कर्म यजमानाचेंच आहे. कारण

are merely subordinate agents, the principal agent being the sacrificer himself. We, Mîmânsakas, hold that when a Vedic text can directly refer to a principal agent, it ought not to be interpreted as applying to subordinate agents. The Vedic text in question, therefore, means that when the sacrificer—the principal agent—commits the sin of over-drinking and vomiting *Soma*, he ought to perform the Soumendra-simple sacrifice."

36. His sacrifice is marred who over-drinks *Soma*; and

**अग्नीला अर्पण करण्याच्या आठ कपालांवर भाजलेल्या पुरोडाशाचीं दोनच अवदानें अर्पण करायाचीं हा विचार.**

**३७. हवीचें सर्व एक अवदान करावें; कारण ( वेदामध्यें ) त्याचें प्रयोजन ( असें वर्णिलें ) आहे. ( पू० )**

**३८. तसें नव्हे; तुकडे पाडून अवदान घेतल्यानें शेष राहावा. ( सि० )**

THE SUBJECT OF TWO PORTIONS—OF A PURODÂSHA CAKE BAKED ON EIGHT POTSHERDS AND TO BE OFFERED TO AGNI —BEING PERMITTED TO BE OFFERED.

37. The whole of the offering is to be made (at once) because its purpose (is thus pointed out in the Veda.) (Opponent's statement.)

38. Not so; there ought to be a residue on account of (the two oblations) being cut up (from the Purodâsha-cake.) (Final statement )

---

ऋत्विजांना स्वतंत्र कर्मच नाहीं. ते जें जें करतात तें यजमानाकरितां. मग ज्याचें कर्म बिघडतें त्यानेंच सौमेंद्र इष्टि करावी हें स्पष्टच आहे. बौद्धाचार्यांचा आणि वैदिकाचार्यांचा असा वाद कां झाला हें समजून घेतांना वाचकांनीं असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आर्यांचा संप्रदाय आणि वेद या मध्यें विरोध आहे असें सिद्ध करण्याचा बौद्धाचार्यांचा उद्देश आहे. आणि त्याचें खंडन करण्यास वैदिकाचार्य झटतात, हें सहज आहे.

३७. बौद्धाचार्य म्हणतात:—दुसऱ्या एका वेदवाक्याच्या अर्थाविषयीं आम्हास विचार करायाचा आहे. तें वेदवाक्य हें:—"अमावास्येच्या दिवशीं किंवा पूर्णि-

drinking Soma is the act of the sacrificer himself; because the officiating priests are not independently recognized. Whatever they do is done for the principal agent. It is plain, therefore, that he, whose sacrifice is marred, ought to perform the Soumendra—simple sacrifice. The reader can easily understand the bearing of this controversy when he remembers that the Bouddhâchârya is determined to show that the injunctions of the Vedic text conflict with the customs and practices of the Âryas, and that the Vaidikâchârya naturally tries to defend them.

37. The Bouddhâchârya states :—" I have to examine the interpretation and application of another Vedic text. It is this. 'A Purodâsha-cake--to be baked

सूत्राणि.

**उपायो वा तदर्थत्वात् ॥ ३९ ॥ ( आ० ) ॥**

**भावार्थः** । सर्वहविःप्रदानार्थं द्विष्टमुपायमात्रं । यद्धोतव्यं तद् द्विरवखंडनेन होतव्यं । तस्माद् यत् मीमांसकेनोक्तं तत् न । कृत्स्नं हविर्होतव्यमिति न्याय्यं ॥

**कृतत्वात्तु कर्मणः सकृत् स्याद् द्रव्यस्य गुणभूतत्वात् ॥ ४० ॥ ( आ० नि० ) ॥**

**भावार्थः** । यत् पूर्वपक्षकारिणोक्तं तत् न । सूत्रस्यास्य द्वे दले विद्येते । प्रथमदलेन सकृद् हविषः प्रदानं कृतं चेद् यागः कृतः । कृते यागे तस्य कृतत्वं । पुनः द्वितीययागं विना हविःप्रदानं कर्तुं न शक्यते । प्रथमयागाद् द्वितीययागो भिद्यते । तस्माद् यागस्यावृत्तिः । किमर्थमावृत्तिरेषा । द्रव्यस्य यागेन सह संबंधात् । कः स संबंधः । यागस्य प्राधान्य द्रव्यस्य गौणत्व । गौणस्य व्यवस्थार्थं या प्रधानस्यावृत्तिः प्राप्नोति साऽन्याय्या । तस्मात् कृत्स्नस्य हविषो द्विरवखंडनेन न हवनं । किं तर्हि । सर्वस्माद् हविषो द्वौ खंडौ होतव्यौ । अवशिष्टं हविः संग्रहीतव्यं च ॥

भल्या दिवशीं आठ कपालांवर भाजलेला आणि अग्नीस अर्पण करावयाचा पुरोडाश अर्पणकेला. मग अच्युत म्हणजे ध्रुव होतो." हें वेदवाक्य उद्देशून आम्ही असें म्हणतों. सारा पुरोडाशरूप हवि एकदम अग्नीस अर्पण करावा. त्याचे तुकडे तुकडे करून, निरनिराळीं अवदानें घेऊन, अग्नीला पुरोडाश अर्पण करूं नये. परंतु तुम्हा आर्यांचा संप्रदाय कसा आहे तो पहा ते त्या

on eight potsherds and to be offered to Agni (if offered) either on the new or the full moon day—becomes permanent." This Vedic text sanctions that a whole Purodâsha-cake—baked on eight potsherds—constitutes one offering, and that it is not to be divided into parts and to constitute separate offerings. But see what the custom of the Âryas on this point is. They cut the Purodâsha-cake into two parts to be offered to Agni as two independent oblations. This sa-

**३९. तसें नव्हे; पुरोडाशाचें प्रयोजन साधावें म्हणून ( हा ) उपाय ( आहे. ) ( आ० ).**

**४०. तसें नव्हे; कर्म कीं, तें एकदां; कारण द्रव्य गौण आहे. ( आ० नि० )**

39. Not so; a purpose (is to be served) because (a Purodâsha-cake being mentioned) (it is) a means. (Doubt).

40. Not so; an action (sacrifice) being performed, (it is to be considered as the whole, being) once (performed;) because the materials (used are only) subordinate. (Doubt removed.)

---

पुरोडाशाचे दोन तुकडे पाडून, दोन अवदानें कल्पून, ते अग्नीस अर्पण करतात. हा त्यांचा संप्रदाय वेदास सोडून आहे असें जें आम्हीं वेदवाक्य घेतलें आहे त्यावरून स्पष्ट दिसतें.

३८. वैदिकाचार्य म्हणतातः- "बौद्धाचार्य, पुरोडाशाचे दोन तुकडे काढून द्यावेत आणि कांहीं पुरोडाश अवशिष्ट राखावा असा वेदवाक्याचा अर्थ आहे. दुसऱ्या वेदवाक्यावरूनहि असें सिद्ध होतें. '(पुरोडाशरूप हवीचीं)' दोन 'अवदानें काढतो.' हें एक वेदवाक्य, दुसरें, 'दोन अवदानांचें हवन करतो.' या वेदवाक्यांस घेऊन अर्थ बसविला असतां तुम्हीं घेतलेल्या वेदवाक्याचा अर्थ असा होतो कीं, आठ कपालांवर भाजलेल्या पुरोडाशाचीं दोन अवदानें काढून तीं अग्नीस अर्पण करावीं, आणि कांहीं पुरोडाश बाकी राखावा." असें वैदिकाचार्यांचें म्हणणें पडलें. तैत्तिरीय संहितेंतील वाक्य घेऊन बौद्धाचार्य भां

crificial practice, therefore, conflicts with direct injunctions of the Veda as is shown by the illustrative text I have quoted and interpreted."

38. Two Vedic texts to be quoted bear on this subject. They distinctly state that after two offerings are taken from a Purodâsha-cake, a part of it ought to remain. One of the Vedic texts is:—"He cuts up twice (two offerings) from the (main) oblation." The other Vedic text is—"He sacrifices two offerings." The Vaidikâchârya observes:—"Bouddhâchârya, these Vedic texts fix the interpretation of the text (quoted under the preceding sutra.) It ought to mean then that two offerings—cut up from the Purodâsha-cake baked on eight potsherds—are to be made unto Agni, and that a part of the Purodâsha-cake ought to be left as a residue." It is to be observed that the Bouddhâchârya bases his argument upon a text in the Taittiriya-sanhita, and that the Vaidikâchârya seeks to refute him by quoting texts

सूत्राणि.

**शेषदर्शनाच्च ॥ ४१ ॥ ( हे० ) ॥**

**भावार्थः ।** वेदेऽवशिष्टहविषः स्पष्टनिरूपणं दृश्यते । तस्मादवशिष्टं हविः संग्रहीतव्यं ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

शेषात् इडामवद्यति । शेषात्स्विष्टकृतं यजति ॥

**सर्वशेषैः स्विष्टकृदनुष्ठानाधिकरणम् ॥**

**अप्रयोजकत्वादेकस्मात् क्रियेरन् शेषस्य गुणभूतत्वात् ॥ ४२ ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः ।** स्विष्टकृत्कर्मणि भिन्नहविषां भिन्नशेषा विद्यंते । तत्र ये शेषास्ते गुणभूताः । तेनैकस्मात् शेषाद् हवनं कर्तव्यं । कुतः । शेषाणां किंचिदपि प्रयोजकताऽभावात् ॥

इतात. तैत्तिरीय संहितेच्या बाहेरील वाक्यें आणून वैदिकाचार्य या वाक्याची व्यवस्था करतात हें वाचकांनी लक्षांत ठेवावें.

३९. बौद्धाचार्य म्हणतात:—"वैदिकाचार्य, तुम्हीं जीं वेदवाक्यें घेतलीं आहेत त्यांची व्यवस्था आम्हास करतां येते. पुरोडाशाचे दोन तुकडे पाडून दोन अवदानें द्यावींत खरी. त्यांच्या वर तूप लावण्याचा संस्कार करावा खरा. तरी असें करणें हा पुरोडाश अर्पण करण्याचा उपाय आहे. एणेंकरून सारा पुरोडाश एकदम अर्पण करूं नये असा निषेध सिद्ध होत नाहीं. म्हणून सारा पुरोडाश अर्पण करावा हें योग्य आहे."

other than those in the Taittirîya-sanhitâ.

39. The Bouddhâchârya observes:—Vaidikâchârya, the interpretation of the Vedic texts you have quoted can be adjusted. Though according to the Vedic text two offerings are to be cut up from the Purodâsha-cake, and though these are to be acted upon by putting clarified butter upon them; yet this is only the means of preparing the Purodâsha for its being offered up. This preparation, therefore, does not prohibit the Purodâsha—the whole Purodâsha—from being offered up. I, therefore, state that the Vedic text in question prescribes the offering of the whole of the Purodâsha-cake.

40. This sûtra consists of two parts--the first stating that when

४१. पुनः, शेष ( राखात्रा असें वेदांत वर्णन ) दिसल्यामुळें. ( हे० )

41. Again, (the above interpretation of the Vedic text is to be accepted,) because of the remainder of the Purodâsha being mentioned (in the Veda.) (Argument in support of the final statement.)

## साऱ्या अवशिष्ट राहिलेल्या पदार्थांनीं स्विष्टकृत् यज्ञ साधावा हा विचार.

THE SUBJECT OF THE OFFERING TO THE SVIS*t*AK*r*IT FIRE CONSISTING OF THE RESIDUE OF ALL OFFERINGS.

४२. सारे अवशिष्ट राहिलेले पदार्थ ( स्विष्टकृताचें ) साधन नाहींत म्हणून एका अवशिष्ट राहिलेल्या पदार्थापासून ( तीं स्विष्टिकृत् इष्टि ) करावी. कारण अवशिष्ट राहिलेला पदार्थ त्यांचा गुण आहे. [ पू० ]

42. Because of (the residue of all the offerings) not being the means, (these) are to be performed from the residue of one offering; because the residue is (merely) a subordinate material. (Opponent's statement.)

४० या सूत्राचीं दोन दलें पडतात. प्रथम दलामध्यें असे वर्णन केलें आहे कीं, पुरोडाशरूप हवि अग्नींत एकदां अर्पण केला कीं, याग सिद्ध झाला. म्हणजे याग होऊन चुकला म्हणजे पुनः जर हवि अर्पण करावयाचा तर पुनः याग केला पाहिजे. म्हणजे पहिला याग निराळा, दुसरा याग निराळा. म्हणजे यागाची आवृत्ति करावी असें निष्पन्न झालें. आतां अशी आवृत्ति कां करावी? द्रव्याचा आणि यागाचा संबंध आहे म्हणून. पुरोडाशरूप द्रव्याचा आणि यागाचा काय संबंध

the offerings of the Purodâsha-cake are thrown into Agni, the sacrifice is performed---it is completed. If another offering is to be made to Agni, a second sacrifice ought to be performed. Under these circumstances the two sacrifices would be different. All these statements amount to this that the sacrifices are to be repeated. How is this repetition to be explained? There is a relationship between a sacrifice and its materials. Materials are only the subordinate means; the sacrifice itself is the principal end sought. It is the relationship between the qualified and its qualities. In order that the qua-

सूत्राणि.

**संस्कृतत्वाच्च ॥ ४३ ॥ ( हे० ) ॥**

**भावार्थः ।** स्वप्रतिपादनदार्ढ्याय पूर्वपक्षकारः पुनर्ब्रवीति । सर्वेषां हविषां पूर्वं जातसंस्कारत्वं । तेन यत् प्रधानं हविस्तदपि संस्कृतं । तेन पुनः संस्कारापेक्षा नास्ति । अत एकस्माच्छेषो होतव्यो न तु सर्वेभ्यः ॥

आहे? द्रव्य गौण, याग मुख्य. असा गुणगुणिसंबंध आहे. गौणाची व्यवस्था लागावी म्हणून प्रधानाची आवृत्ति झाली असता दोष आहे. म्हणून आंगठ्याचे कांड्या एवढें सर्व पुरोडाशाचे दोन तुकडे पाडून ते पुरोडाश अग्नीस क्रमानें अर्पण करावा असा वेदवाक्याचा अर्थ नाहीं. कसा अर्थ तर? साऱ्या पुरोडाशांतून दोन तुकडे घेऊन त्याचें हवन करावें. आणि कांहीं पुरोडाश बाकी राखावा असा या वेदवाक्याचा अर्थ आहे.

४१. वैदिकाचार्य म्हणतातः—या मंत्रंधानें वेदवाक्यें कशीं आहेत तीं पहा. "शेष राहिलेल्या पुरोडाशामधून अवदान घेऊन इडा नांवाचा भक्ष सिद्ध करतो." दुसरें वाक्य. "शेष राहिलेल्या पुरोडाशांतून अवदान घेऊन स्विष्टकृत् नांवाचा याग करतो." या वेदवाक्यावरून पुरोडाशांतून शेष ठेवावा असें वेदांत स्पष्ट वर्णन आहे. म्हणून बौद्धाचार्य तुमचें म्हणणें अप्रशस्त आहे.

४२. बौद्धाचार्य वैदिकाचार्यांची कोंडी करावयास पाहतात. ते असें म्हण-

lities may be adjusted, the principal cannot be repeated For these reasons it is to be seen that the Vedic texts in question do not prescribe that bits of the whole Purodâsha cake--after being cut up, each as big as the joint of a thumb---are to be at once offered into fire in an order. What do the texts prescribe then? Two bits are to be cut from the whole Purodâsha and to be offered. This completes a sacrifice rather than an offering. And the part of the Purodâsha, that remains, is to be reserved for use.

41 The Vaidikâchârya observes:--"Bouddhâchârya, see what other texts bearing on this subject are. "He cuts up (the portion to be eaten up by the officiating priests and the sacrificer) as their sacrificial food (idâ), from the remaining Purodâsha." The second Vedic text is:--"He sacrifices unto Svistakrit fire by means of the remaining (Purodâsha)." The Vedic texts show that the Veda directly prescribes that a part of the Purodâsha is to be reserved for use. Bouddhâchârya, your interpretation of the Vedic text is, therefore, improper.

42. The Bouddhâchârya seeks

**४३. पुनः; संस्कार केलेला असतो म्हणून ( हे० ).**

43. Again, because of the materials of the offerings of the main sacrifice being already acted upon. (Argument in support of the opponent's statement.)

तात:-वैदिकाचार्य, दर्शपूर्णमासा सारखी इष्टि केली, त्यामध्यें कांहीं हवि दिले, त्या हवींचा निरनिराळा संबंध आहे. त्या निरनिराळ्या हवींचे शेष राहतात. त्यांतून इडाभक्षण, प्राशित्रभक्षण आणि स्विष्टकृत् आहुति, हें तीन प्रकार करायाचे. वैदिकाचार्य, अवशिष्ट राहिलेल्या हवी पासून हीं कर्मे करायाचीं असें तुम्ही म्हणतां. परंतु या तुमच्या म्हणण्याचा अर्थ आम्हास स्पष्ट कळत नाहीं. एका हवींतून अवशिष्ट राहिलेल्या द्रव्याच्या योगानें इडाभक्षण, प्राशित्रभक्षण, आणि स्विष्टकृत् याग हीं कर्मे करावींत. निरनिराळ्या हवींतील अवशिष्ट राहिलेलें जें कांहीं तें घेण्याची आवश्यकता नाहीं. कारण अवशिष्ट राहिलेलें द्रव्य केवळ या कर्मांचा गुण आहे, कारण सारे गुण तेथून सारखे. म्हणून कोणत्या तरी एका हवींतील जें अवशिष्ट राहिलें त्यांतून हीं कर्मे केलीं म्हणजे झालें. असें आमचें म्हणणें आहे. सूत्रांतील करावीं या क्रियेचें कर्म "तीं" असें समजावें. तीं म्हणजे तीन सांगितलेलीं कर्मे.

४३. पूर्वपक्षकार आपलें बोलणें दृढ करितो. तो असें म्हणतो कीं, दर्शामध्यें किंवा पूर्णमासेष्टि मध्यें तीन

to bring the discussion to a point:—Vaidikâchârya, the new or the full moon sacrifice, for instance, is performed. Certain offerings are offered—offerings connected with different gods; part of these offerings is reserved to be used as sacrificial food (idâ), as the special food for the Brahma priests, and as offerings to the Svi*s*ta*k*rit. These three are separate arrangements. Vaidikâchârya, you say that those arrangements are to be effected by means of the residues of all the offerings of the main sacrifice, such as the new or the full moon sacrifice. But I do not understand the basis of your statement; I state that these three arrangements—such as the distribution of the sacrificial food among all the priests and the sacrificer (Idâbhak*s*a*n*a), the presentation of a special dish of sacrificial food to the Brahma priests (Prâshitrabhak*s*a*n*a), and the offering to the Svi*s*ta*k*rit fire—can be effected by means of the residue of one offering connected with the main sacrifice; and that there is no necessity of using the residues of all offerings; because the residue of an offering is merely subordinate—a mere quality. Because all qualities or subordinate agents are equally important; I repeat that all the three ar-

## सूत्राणि.

**सर्वेभ्यो वा कारणाविशेषात् संस्कारस्य तदर्थत्वात्**
**॥ ४४ ॥ ( सि० ) ॥**

**भावार्थः** । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन्न । विशेषतः कारणं न वर्तते । येनैकं हविः प्रदेयं भवेत् । सर्वाणि हवींषि संस्कृतानि संति । संस्कारस्तु हविः प्रदानार्थं । तस्मात् सर्वेभ्यः प्रधानहविःशेषेभ्योऽवदानानि ग्रहीतव्यानीति सूत्रार्थः ॥

पुरोडाश करावे लागतात, आणि तीन प्रधान देवतेला निरनिराळ्या आहुति द्याव्या लागतात. परंतु या आहुतींच्या संबंधानें प्रयाज किंवा अनुयाज इत्यादि जे संस्कार होतात ते संस्कार एकदां होतात. मग अंगकर्माच्या योगानें प्रधानावर एकदां संस्कार होतो. म्हणूनच, वैदिकाचार्य, एका पुरोडाशातून अवशिष्ट जें राहिलें त्याच्याच योगानें स्विष्टकृत आहुति द्यावी हें योग्य आहे. निरनिराळ्या पुरोडाशाचीं अवशिष्टें घेण्याची आवश्यकता नाहीं.

rangements can be effected by using the residue of one offering only. The term *these*, nominative to the verb *are to be performed*, is to be understood and refers to the three arrangements spoken of.

43. The Bouddhâchârya adduces an argument in support of his statement made in the preceding sûtra. He observes that in performing the new or the full moon sacrifice three Purodâsha-cakes are to be prepared, and three principal gods are to be sacrificed to. But such operations as of chaunting the *Prayâja mantra* and *Anuyâja mantra* are performed upon these offerings only once. Hence the operations to be performed upon a main offering which are acted upon once only are determined by subordinate offerings. It is, therefore, proper, Vaidikâchârya, to take all the offerings connected with the simple sacrifice from the residue of one main offering only. The residues of different Purodâsha-cakes are not to be used.

**४४. तसें नव्हे; सर्वांचीं (अवशिष्टें योजावींत.) कां तर विशेष कारणाचें निरूपण नाहीं. कारण जो संस्कार करायाचा तेणेंकरून प्रधानाचें प्रयोजन साधतें. (सि०)**

44. Not so; from all (the purodâsha cakes bits are to be cut up as offerings;) because of the absence of a special reason. Because the preparatory operation performed upon a main offering serves its propose. (Final statement.)

४४. वैदिकाचार्य म्हणतात:-बौद्धाचार्य, तुमचें म्हणणें प्रशस्त नाहीं. पुरोडाशावर संस्कार केले ते कशा करितां. कारण कीं त्याची प्रधान आहुति या संबंधानें त्यावर योग्य संस्कार व्हावा. स्विष्टकृत आहुति मध्यें पुरोडाशांतील अवशिष्टाची योजना करून त्यांची प्रतिपत्ति करायाची हा एक संस्कारच आहे. मग एखाद्या पुरोडाशाच्या अवशिष्टाची अशी योजना केली नाहीं, तर त्याच्या संबंधानें प्रतिपत्ति हा संस्कार चुकेल. मग संस्कार जर चुकला, तर संस्कार आपलें कार्य कसें साधील? आणि प्रधान द्रव्यावर सारे संस्कार झाले असें आम्हास कसें म्हणतां येईल? म्हणून या एका कारणामुळें, बौद्धाचार्य, तुमचें म्हणणें आम्हास पतकरत नाहीं. बरें, एकाच पुरोडाशाचें अवशिष्ट घ्यावें आणि त्यानेंच स्विष्टकृत कर्म करावें असें वेदांत विशेष वर्णन तरी कोठें आलें आहे? असें विशेष वर्णन कोठें आलें नाहीं. या दुसऱ्या कारणावरून तुमचें म्हणणें आम्हास, वैदिकाचार्य, पतकरत नाहीं. आमचें म्हणणें असें आहे कीं, प्रधान देवते करितां केलेले

44. The Vaidikâchârya observes :— "Bouddhâchârya, what you state is not reasonable. Why are preparatory operations performed upon Purodâsha-cakes? Because as main offerings, they require to be acted upon in a particular way. The use of such Purodâsha-cakes in the simple sacrifice known as the Svistakrit is *only* a *subsidiary* operation. For this disposes finally of the residues of Purodâsha-cakes, as it constitutes what is known in the Pûrva-Mîmânsâ as *pratipatti*, e. g. final disposal of an unused portion of a sacrificial material. Now then when the residue of a Purodâsha-cake is not used in the svistakrit simple-sacrifice, an important operation—to be performed upon it—is omitted, that is, the main offerings consisting of the Purodâsha-cakes could not, under these circumstances, be acted upon in every way prescribed in the Veda. For this reason, Bouddhâchârya, I cannot admit your statement. Again, your statement is not supported by any direct Vedic text—your statement that the residue of any of the three purodâsha-cakes prepared for the main sacrifice may be used as an offering in the

सूत्राणि.

**लिंगदर्शनाच्च ॥ ४५ ॥ ( हे० ) ॥**

**भावार्थः ।** लिंगं च दृश्यते । स्पष्टः सूत्रार्थः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

देवा वै स्विष्टकृतमब्रुवन् हव्यं नो वह । सोऽब्रवीत् वरं वृणै भागो मेऽस्त्विति । वृणीष्वेति तेऽब्रुवन् । सोऽब्रवीदुत्तरार्धादेव मह्यं सकृत् सकृदवद्यात् ॥

## प्राथमिकशेषात् स्विष्टकृदाद्यनुष्ठानाधिकरणम् ॥

**एकस्माच्चेद्यथाकाम्यविशेषात् ॥ ४६ ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः ।** कस्मात् चिदेकस्मात् शेषात् प्रथमं हविर्ग्रहणीयं चेद् यथा यजमान इच्छति तथा स शेषो भवेत् । प्रथमो द्वितीयः तृतीय इति क्रमभंगः स्यात् नाम द्वितीये स्थाने तृतीयो भवेत् । तेन सर्वत्रानियमापत्तिः ॥

---

जे तीन पुरोडाश त्या पुरोडाशांच्या आहुति प्रधान देवते करितां देऊन तिहींतून तीन जीं निरनिराळीं अवशिष्टें राहिलीं त्यांच्या योगानें स्विष्टकृत साधायाचें.

subsidiary simple sacrifice known as *svistakrit*. I, therefore, cannot admit your statement. My proposition is that in the case of the *Svistakrit* subsidiary simple sacrifice, the residues of the three Purodâsha-cakes intended for the main gods of the main sacrifice, such as the new or the full moon sacrifice, are to be used."

हेतु आले आहेत. पहिल्यानें इतकें पहायाचें कीं, ज्या वेदवाक्यांचें प्रमाण घेतलें आहे त्यांच्या अर्थाचा विचार केला पाहिजे. त्यांमध्यें जीवाचें, वायूचें आणि परब्रह्माचें वर्णन आहे. असें म्हटलें तर कसें चालेल? त्यामध्यें परब्रह्माचेंच वर्णन आहे. यावर पूर्वपक्षकार म्हणतो—मग एकाच वाक्यामध्यें तिहींचें वर्णन कसें होईल? बरें तिहींचें वर्णन एकाच वाक्यांत आहे असें म्हटलें तर एका वाक्याचीं दोन तीन वाक्यें करावीं लागतील. वाक्यभेदरूप दोष प्राप्त होईल. म्हणून तिहींपैकीं एकाचेंच वर्णन त्यांत आलें आहे असें पतकरलें पाहिजे. मग तिहींपैकीं एक तें कोणतें घ्यायाचें? कां जीव, कां वायु, कां परब्रह्म घ्यायाचें. पूर्वपक्षकार, परब्रह्माचें वर्णन त्या वेदवाक्यांत आलें आहे असें म्हणावें हें बरें. सूत्रांतील उपासना त्रैविध्यपदाचा विचार पुढें करूं. इतका पहिला हेतु. दुसरा हेतु असा कीं, दुसऱ्या वेदवाक्यांत परब्रह्माचेंच वर्णन मुख्यत्वें करून आलें आहे. मग ज्या रीतीनें दुसरीं वेदवाक्यें लावायाचीं त्याच रीतीनें इंद्रादिकाविषयींचीं वेदवाक्यें लावलीं पाहिजेत. दुसरें असें आहे कीं, एक ब्रह्माचें निरूपण केलें म्हणजे जीव आणि वायु यांचें निरूपण झालेंच. जीवाला किंवा वायूला आश्रय कशाचा? परब्रह्माचाच, दुसरा कशाचा नाहीं. म्हणून वामदेवादिकांचीं जीं वर्णनें किंवा इंद्रादिकांच्या ज्या कथा वेदामध्यें आ-

is that the Upanisad-texts quoted in support of the preceding sûtras is to be considered. How can it be said that they describe the human spirit, the air and Brahma? No they describe the Supreme Brahma alone." Against this the opponent observes:—"How can one and the same text describe the three—the human spirit, the air and the Supreme Spirit? If it be said that the three are thus described, then it will be necessary to divide one and the same sentence into three different sentences. Thus the exegetical defect known as the division of a sentence will ensue. Hence it is necessary to admit that one of the three—the human spirit, the air and Brahma—is described in the Upanisad text quoted. Of the three which one is to be taken? Whether the human spirit or air or the Supreme Brahma?" The reply is—hence it is proper to admit that the Supreme Brahma is described in the Upanisad-text quoted. The meaning of the term Upâsanâ-traividhya or a three-fold-devotion as used in the sûtra will be examined in the sequel. This is the first reason. The second reason is—that in the Vedic texts other than those quoted, the Supreme Brahma is principally described. Hence as these Vedic texts are interpreted, so the Vedic texts about Indra and Vâmadeva are to be interpreted. Again, the examination of the Supreme Brahma necessarily includes that of the human spirit and the air (Prâna). What supports the human spirit or the air? Indeed nothing but the Supreme spirit or Brahma. Hence in the stories of Vâmadeva

त्या आहेत त्यामध्यें वामदेवादि आणि इंद्रादि जीवांचें वर्णन नाहीं. किंवा वायूचें वर्णन त्यामध्यें नाहीं. त्यामध्यें परब्रह्माचेंच वर्णन आहे. अशी योजना त्या वेदवाक्याची करायाची. या सूत्राच्या दुसऱ्या दळांतील पदें बरोबर मांडून वाक्यार्थ करतांना अडचण पडते. इतकें सांगणें पुरें कीं, सूत्रार्थ निरनिराळ्या रीतीनें निरनिराळे आचार्य करतात. वामदेवादिकांच्या आणि इंद्रादिकांच्या ज्या कथा वेदांत आल्या आहेत त्या कथांमध्यें परब्रह्मावाचून दुसऱ्या कशाचें वर्णन नाहीं असें सिद्ध करण्यावर शंकराचार्यांचा बहर आहे. मध्वाचार्य त्यामध्यें विष्णूचेंच वर्णन आहे असें दाखवितात. रामानुजांनीं तीन प्रकारची उपासना आहे असें अंगीकारलेंसें दाखविलें आहे. ती तीन प्रकारची उपासना कोणती ? इंद्रादि जीवांची उपासना किंवा वायु सारख्या देवतांची उपासना, किंवा परब्रह्माची उपासना. परंतु परब्रह्म म्हणजे पुरुषोत्तम, परमेश्वर. तोच मुख्य. आणि प्रथम उपासनीय सर्व चिदात्मक आणि जडात्मक यांचा अंतरात्मा हा असें दाखविण्याचा वेदाचा हेतु आहे. म्हणून मनुष्य, इंद्र, आणि वायु, अशा ज्या जीव कोटी त्याना आश्रय देणारा पुरुषोत्तम, परमेश्वर, सर्व जगताचें कारण, त्याचीच उपासना योग्य, असें रामानुज म्हणतात जड आणि जीव हीं दोन्हींहि ब्रह्म असें वल्लभाचें मत आहे. आतां ज्या उपनिषद्वाक्यांचें प्रमाण घेतलें त्यांचा

and Indra narrated in the Veda the spirit of Indra or Vâmadeva is not referred to; nor is the air (Prâ*na*) described in them but the Supreme Brahma alone is described. This is the way in which the Vedic texts already quoted are to be interpreted. We find it hard to arrange the different terms of the second part of the sûtra and to fix their relationship. Suffice it to state that this sûtra is differently interpreted by the different Âchâryas. Shankarâchârya attempts to prove that nothing but the Supreme Brahma is described in the stories of Vâmadeva and Indra narrated in the Veda. Madhvâchârya insists upon such term as the spirit (Prâ*na*) signifying Visnu alone. Râmânuja seems to accept a three-fold devotion. What are the three kinds of devotion? What Gods are to be adored in three different ways? First, such Gods as Indra having a body and the human spirit; secondly, such godlike beings as the air (Vâyu) and the Supreme Brahma; but the Supreme Brahma is the highest person or the great God; He alone is principal and first to be adored. It is the object of the Vedas to point out the inner soul of every thing intelligent and material. Hence adds Râmânuja, the adoration of the great God, the hightest Person, the cause of the whole universe—He who upholds such beings as man, India and the air—the adoration of this Supreme Being is proper. Vallabha reiterates his doctrine that the material and the spiritual are the two together the same essence—Brahma. Now the translation of

अर्थ करायाचा. "(आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, वाणी, मन, चक्षु, श्रोत्र) याना वरिष्ठ प्राण बोलला; तुम्ही मोहांत पडूं नका. मीच पांच प्रकारें आपला विभाग करून, आणि सर्व कार्य कारणांस दृढ करून, ह्या कार्यकारण संघास मी धारण करतों." "प्राणरूप वायूच्या योगानें, अपानरूप वायूच्या योगानें कोणीहि मनुष्य जीवंत रहात नाहीं. परंतु प्राणरूप किंवा अपानरूप वायूचा जो आश्रय असा जो दुसरा त्याच्या योगानें जीवन रहातात." "तें तूं आहेस." "मी ब्रह्म आहे." "ज्याचें वाचेच्या योगानें वर्णन होत नाहीं, परंतु ज्याच्या योगानें वाणी प्रवृत्त होते, तें ब्रह्म तू जाण. ज्याची जन उपासना करतात तें ब्रह्म नव्हे." "मी प्राण आहे, (मी) प्रज्ञात्मा (आहे.) म्हणजे बुद्धीच्या नाना तरंगामध्यें ज्याचें प्रतिबिंब पडतें तो. (सर्व प्राणांच्या) जीवाचें कारण अमर असें समजून त्या माझी उपासना कर." "तो हा प्राणच प्रज्ञात्मा. हें शरीर घेऊन त्याला उठिवतो, म्हणून ह्याच मंत्राची (उक्थ) उपासना कर. ती हि प्राणाच्याच ठायीं सर्व व्याप्ति. (सर्व व्याप्ति म्हणजे सर्व इंद्रियें आपआपले विषय घेऊन प्राणास नेऊन अर्पण करतात. ते प्राणास प्राप्त होतात.) अरे; जो प्राण ती प्रज्ञा, जी प्रज्ञा तो प्राण. + + + प्रज्ञा आणि प्राण हे दोघे मिळून या शरीरामध्यें राहतात, दोघे मिळून या शरीरांतून निघून जातात. पुढें ह्या प्रज्ञेकरितां

the Upanisad-texts quoted in support of the sûtra. "The highest spirit (Prâna) spoke to them—(air, æther, fire, water, earth, speech, mind, sight, hearing) oh you, do not get into a delusion: dividing in myself into five (the five Prânas) and upholding this succession of causes and effects (Prâna) I alone support (all) this." "No human being lives by means either of the air breathed in (Prâna) or of the air sent out downward (apâna): indeed (human beings) live by means of another (spirit) in which these (two spirits) abide." "Thou art that." "I am Brahma:" "That which is not described by the tongue but that which describes the tongue—Oh thou, know that indeed, to be Brahma; not this which the people adore." "I am the spirit (Prâna) the soul of wisdom (Prajnâtmâ), worship me as that immortal life or the life-giver or the cause of life and the nectar or the immortal: + + that this spirit (Prâna)—the soul of wisdom itself—taking hold of this body raises it; therefore let him worship that who is himself a song (Uktha). This well-known development -relationship—ultimates in the spirit; that who is indeed the spirit is wisdom; that indeed who is the wisdom is the spirit + + Therefore, these two abide together in this body and then leave it together: We will explain the way in which all the objects are presented (become one) to this wisdom or the soul of wisdom (Prâjnâ). "Speech itself is referred to this (Prajnâ) (being its) one limb or form (Anga); unto it (Prajnâ indeed the objects

सर्व भूतें एक कशीं होतात हें आम्ही व्याख्यान करतों." "वाणीनें हिच्या एका अंगाचें दूध काढलें. (म्हणजे वाणीनें प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेतलें.) म्हणजे तिच्या पासून पुढें भूतमात्राचीं नांवें पडलीं. + + + प्रज्ञेच्या योगानें वाणीवर स्वार होऊन वाणीच्या योगानें पुरुषास सर्व नामांचें ज्ञान होतें. + + + त्या या दहाच भूतमात्रा ज्ञानेंद्रियावर अधिकार करून राहतात. आणि दहा प्रज्ञामात्रा भूतांवर अधिकार करून असतात. कारण जर भूतमात्रा नाहींत तर प्रज्ञामात्रा नाहींत. अथवा जर प्रज्ञामात्रा नाहींत तर भूतमात्रा नाहींत. कारण परस्परावाचून कांहींच रूप सिद्ध व्हावयाचें नाहीं. खचित हे भिन्न नाहींत. यास दृष्टांत. रथाची धाव आऱ्यामध्यें बसवलेली आणि आरे तुंब्यामध्यें बसविलेले, असेंच भूतमात्रा (विषय) यामध्यें आडकिवलेल्या आहेत. प्रज्ञामात्रा (इंद्रियें) प्राणामध्यें आडकिवलेल्या आहेत. तो हा प्राणच प्रज्ञात्मा. सुखी, अजर, आणि अमर."

afterwards are re-described + + + The Prâna or the spirit by means of wisdom, intelligence or understanding having mounted speech obtains all the names by means of speech : indeed these objects are ten in relation to the understanding : the senses are ten in relation to the objects : If these objects did not exist, the senses would not exist : Because no form whatever would be made out by means of æther (the objects of the sense). This is not varied or unconnected ; because as a felly is fixed into the spokes of a car (and) the spokes are fixed into the nave, so indeed these objects are related to the senses and the senses are related to the spirit (Prâna). This well-known spirit is indeed the soul of wisdom or the essence of understanding, blissful, ever young and immortal."

## उपसंहार.



बादरायण सूत्राचे चार अध्याय आहेत म्हणून पूर्वी आम्हीं वर्णन केलें आहे. आणि त्या चार अध्यायांतील विषय कोणते हें सांगितलें आहे. प्रथम अध्यायामध्यें ब्रह्माचें निरूपण कसें वेदांत केलें आहे हें दाखविलें आहे. दुसऱ्या अध्यायामध्यें सांख्य पंडितादिकांचें खंडन केलें आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें ब्रह्मविचाराचीं वैराग्यादि साधनें कोणतीं हें दाखविलें आहे. आणि चवथ्यामध्यें मुक्ती कोणती आणि कशी याचा विचार केला आहे. अस्तु. हें ब्रह्मसूत्र कोणीं लिहिलें आणि केव्हां लिहिलें अशीं ग्रंथकार निर्णयाचीं आणि काल निर्णयाचीं साधनें आम्हास वाचकांपुढें एकदम मांडतां येत नाहींत. कारण ऐतिहासिक प्रमाणें दोन प्रकारचीं आहेत. एक अंतरंग आणि दुसरें बहिरंग. वैदिक आर्यजनांच्या इतिहासविचारांस बहिरंग प्रमाण बहुधा लागूं पडत नाहीं. म्हणून अंतरंग प्रमाणावरच सारा भार टाकावा लागतो. म्हणून अंतरंग प्रमाणाची योग्यता मोठी आहे. परंतु अंतरंग प्रमाणास जीं साधनें लागतात तीं साधनें ब्रह्मसूत्राचा जसा जसा विचार होईल तशीं तशीं उत्पन्न होतील. म्हणून सध्या ब्रह्मसूत्रकार कोण आणि केव्हां झाला हा विचार करतां येत नाहीं.

या ब्रह्मसूत्राची योग्यता मोठी आहे हें आम्हास सांगण्यास नको. सिंधू

## SUMMARY.



We have already stated that the Vedântic system of Bâdarâyana consists of four books (Adhyâyas) and have pointed out what subjects are explained in them. The first Adhyâya discusses how Brahma or the Supreme Spirit is propounded in the Veda; the second Adhyâya examines and refutes the doctrines of such schools of philosophy as that of the Sânkhyas; the third Adhyâya enumerates and enunciates the means of realizing Brahma or the presence of the Supreme Spirit such as self-abnegation (Vairâgya); the fourth Adhyâya explains the nature of the salvation of man, and how it is to be accomplished. We cannot, at once and at this stage of our studies, place before our readers our conclusions as to who the author of the Brahma-sûtra really is, and when he flourished; because of the two systems of evidence—the one being based on external and the other on internal evidence, the former can seldom apply to the writings of the Vedic Âryas, internal evidence is, therefore, availed of as much as possible, and, therefore, it is specially important. But as we progress in the explanation of the system itself, internal evidence will develop, and we shall carefully lay it before our readers so that they may verify it and examine it for themselves.

We need not state that the importance of the Brahma-sûtra is great. The religious thought and spiritual aspirations of all the people of India from the Himâlayas to the cape Comorin are

नदीवरील अटेक पासून तों थेट कन्याकुमारी पर्यंत सर्व भरत खंडभर ब्रह्मसूत्राच्या धोरणानें सर्व लोक विचार करतात. पुरुषार्थ म्हणजे काय हें नीट समजणें आवश्यक आहे. भरत-खंडामध्यें जरी सर्व जनांचा अभिलाष ऐहिक सुखप्राप्ति व्हावी असा आहे आणि ती साधण्याकरितां जरी ते रात्रं दिवस झटतात तरी त्यांना विचारलें कीं पुरुषार्थ तो कोणता म्हणजे ते उत्तर देतात कीं, सर्वसंगपरित्याग; आम्हास तुम-च्या ऐहिक सुखप्राप्तींचीं साधनें नको-त; आम्हास सामाजिक सुखाचीं साधनें नकोत; आम्हास परदेशाशीं संग्रामप्रसंग नको; आम्हास व्यापार नको; आम्हास कलाकौशल्य नको; आम्हास शेतकी सारखा उद्दीम नको; कर्मांचा क्षय व्हावा म्हणून आम्ही एथें प्रपंचांत सुख दुःख भोगीत आहों; उपाय नाहीं म्हणून उदरनिर्वाहकरितां उद्योग करीत आहों; परंतु संसार मा-या; प्रपंच व्यर्थ, आणि सर्व जें कांहीं आहे तें मिथ्या. अशी मनाची पक्की खातर-जमा करणें हाच कायतो परम पुरुषार्थ. हा साधण्याकरितां धर्म करावा, धर्म आचरावा, द्रव्य संपादन करावें किंवा आपल्या इच्छा पूर्ण कराव्यात. परंतु धर्मार्थ काम हा मिथ्या पुरुषार्थ. सत्य पुरुषार्थ म्हणजे मोक्ष. हे विचार आर्यजनांच्या मनांत इतके दृढ बिंबले आहेत कीं, त्यावांचून त्यांना चैन पडत नाहीं. आणि या विचारांचें प्राबल्य एवढें आहे कीं, जे मुसलमान लो-

regulated by the Brahma-sûtra; it is essential to know what is considered to be *the* Summum Bonum of life by the people. Though the people of India are as worldly-minded as possible, and though they always think of nothing but of the means of the pleasures of this life, yet when asked what is the highest end of life, they invariably point to self-abnegation and the abdication of the *world*, and declare :—we ought not to seek the pleasures of domestic life, or of social life, war with other neighbouring nations, the development of commerce, or of arts; we cannot follow any industry such as agriculture; we are quietly suffering pain or enjoying pleasure that the accumulated effect of our actions in the previous lives may be annihilated: we follow some pursuit for our daily bread; because we cannot help it. But we know what our highest duty is—to convince ourselves that the pursuits of the world are vain, and that whatever, exists and is perceived, is a mere delusion. To accomplish this, alms are to be given, purity of conduct is to be attended to, wealth is to be acquired, and human desires are to be gratified. But attention to religious duties, the gratification of desires or the acquisition of wealth is only a delusive object of pursuit. The real object to be sought and secured is salvation. These sentiments are so thoroughly ingrained in the minds of the people of India that they can hardly be at ease for a moment without indulging them. The power of these sentiments is so great that the Mohammedans,

कांसारखे निर्बाण, ऐहिक सुखाकरितां झटणारे, आणि प्रपंचामध्यें दृढ गुंतलेले, त्यांहि वीरपुरषांचीं मनें वळलीं, आणि ते ब्रह्मवाद करूं लागले. ते आपल्या स्वतास सोफी असें म्हणवूं लागले आणि ब्रह्म सिद्धांत करूं लागले.

असा हा विलक्षण ब्रह्मसिद्धांत उत्पन्न कसा झाला याचा थोडा विचार आम्ही पूर्वी प्रस्तावनेंत केला आहे. इतिहासदृष्टया हा शोध लावणें आवश्यक आहे. या विषयीं स्वतंत्र विचार केला पाहिजे. इतकें सांगणें एथें पुरें कीं, खरा वेदांतसिद्धांत म्हटला म्हणजे बौद्ध पंडितांचा. म्हणून मध्वाचार्यांचे शंकराचार्यांस प्रच्छन्न बौद्ध म्हणजे छपलेला बौद्ध असें म्हणतात. वेदांताचे निरनिराळे चार प्रकार भरतखंडामध्यें आढळतात. कोणी शांकर आहेत म्हणजे ब्रह्म मात्र सत्य, बाकी सर्व मिथ्या असें मानणारे. हे अद्वैतवादी. दुसरे माध्व आहेत. परमेश्वर आहे, तो जगत्कर्ता आहे, तो जगन्नियंता आहे, जगत् सत्य आहे, संसार सत्य आहे, आणि परमेश्वराचा आणि जीवाचा सेव्यसेवक संबंध आहे. हे द्वैतवादी पंडित. रामानुज असें म्हणतात कीं, पुरषोत्तम, नारायण, लक्ष्मीपति यानें जगत् उत्पन्न केलें आणि जीव उत्पन्न केले आणि मुक्तीकालीं या जीवांस परमेश्वराला जितका आनंद होतो तितका आनंद होतो, आणि त्याचे सर्व गुण त्याला प्राप्त होतात. परंतु जगत्कर्तृत्व आणि ल-

—bent as they were on warfare, fired as they were by religious fanaticism, and carried away as they were by worldly pursuits and worldly glory—were early influenced by Pantheistic transcendentalism, and began to indulge the melancholy thought of the vanity of this life, and to cultivate the philosophy which particularly fosters it. They assumed the name of Soophis, and discussed the nature of Brahma.

We have already proposed the problem of the origin of such a system of philosophy in the introduction to this system. It is historically important and necessary to investigate this subject; but it requires independent inquiry. Suffice it to remark in this place that the true and earnest Vedântins were the Buddhists, and that hence the followers of Madhvâchârya characterize Shankarâchârya as a concealed Buddhist. Four systems of Vedânta-philosophy predominate in India. Some adopt the non-dualistic system and declare that Brahma—the spirit—alone exists and that all else is a mere delusion—a vainty. Some follow the doctrines of Madhvâchârya, and declare that there is a Personal God, that He is the Creator and the Governor of the universe, that the world and this life are real, that the duty of man is to worship his Maker. These are dualists. The followers of Râmânuja state that the Highest Person is Nârâyana, that the lord of Laksmî, Nârâyana, the Highest Person created the universe, and human souls, and in the state of emancipation or salvation, these souls are as capable of happiness

क्ष्मीपतित्व हें ऐश्वर्य जीवांस कधीं प्राप्त होत नाहीं. हे विशिष्टाद्वैतवादी पंडित. शुद्धाद्वैतवादी वाल्लभ असें म्हणतात कीं, परब्रह्म, जीव, आणि जड, यामध्यें भेद मुळींच नाहीं. भेद जो दिसतो तो केवळ परिणामामुळें. जड हा चैतन्याचाच परिणाम आहे. जीव हा जडाचा परिणाम आहे. निरंतर जगताची रहाटी चालली आहे, कांहीं एक नवें उत्पन्न होत नाहीं, कशाचाहि नाश होत नाहीं. एखाद्या पदार्थाचा नाश झालासा वाटतो म्हणजे तो पदार्थ दृष्टी आड जातो. म्हणजे त्याचा तिरोभाव होतो. एखादा पदार्थ उत्पन्न होतो म्हणजे तो मात्र दृष्टीसमोर येतो. म्हणजे त्याचा आविर्भाव मात्र होतो. असें या चार वेदांतवादी पंडितांच्या सिद्धांतांनीं सर्व भरतखंड आकळून टाकलें आहे. म्हणून याविषयीं विचार करणें आवश्यक आहे. या चार सिद्धांतांच्या प्रक्रियेचें विशेष निरूपण आम्ही पुढें करूं. या चारी हि सिद्धांतांचें मूळ म्हटलें म्हणजे बादरायणकृत ब्रह्मसूत्र. आणि चौघांसहि वेद प्रमाण आहेत. मग एका ब्रह्मसूत्रापासून हे चार सिद्धांत कसे उत्पन्न होतात ही गोष्ट मोठी विचार करण्या जोगी आहे. त्या संबंधानें या ब्रह्मसूत्राच्या पहिल्या अध्यायामध्यें वेदांतील आणि उपनिषदांतील निरनिराळीं वाक्यें घेऊन त्यांच्या अर्थाचें पर्यवसान परब्रह्माचे निरूपणावर आहे असें बादरायण दाखवितात. या पर-

as God or Nârâyan himself, and of acquiring all his attributes and powers except the power of creating the world or of possessing Laksmî for wife. These are known as Vishistâdvaita-vâdins. The followers of Vallabha style themselves pure non-dualists and declare that there is no distinction between the Supreme Spirit, the human soul, and matter, that whatever distinction is perceived springs merely from the one being transformed into the other, that matter is only the spirit transformed, that the universe is eternally worked; that nothing new is created, and that nothing already existing is destroyed; that what appears to be destroyed is merely concealed from human sight; it disappears—it undergoes *Tirobhâva*, that what appears to be created merely presents itself to human sight; it reappears, it undergoes *Âvirbhâva.* These four systems of religious thought in one way or other regulate the life of all the people in India. It is, therefore, necessary to discuss and examine these systems. We will explain their distinctive features in the sequel.

But the only source of all these four systems is the work of Bâdarâyana known as the Brahmasûtra which recognizes the Veda as authoritative. The question is interesting and important—how are such discordant systems as those of the Dvaitas and Advaitas derived from the same philosophical work? When Bâdarâyana quotes merely from the Veda and Upanisads, and shows that all his quotations directly point to the Supreme Spirit, Shankarâchârya declares that the Supreme Spirit,

**४५. पुनः, वेदवाक्य हि असेंच अढळतें म्हणून. ( हे० )**

45. Again because of an inferential statement (made in the Veda.) (Argument in support of the final statement.)

## पहिल्या पुरोडाशाच्या अवशिष्टांतून स्विष्टकृत् कर्मास आरंभ करावा हा विचार.

THE SUBJECT OF THE RESIDUE OF THE FIRST PURODÂSHA-CAKE IN THE MAIN SACRIFICE BEING USED FOR THE FIRST OFFERING IN THE SVISṬAKṚIT-SACRIFICE.

**४६. ( कोणच्या तरी ) एका ( पुरोडाशां ) तून ( स्विष्टकृताकरितां पहिली आहुति घ्यावी ) असें म्हटलें तर ( यजमानाची ) जशी विशेष इच्छा असेल त्याप्रमाणें ( त्यानें वागावें. ) ( पू० )**

46. If (it be admitted that the first offering to be made in connection with the svistakrit-sacrifice may be taken) from any one (of the three Purodâsha-cakes,) then as the Yajamâna specially wishes, so the order of the offerings may be established. (Oppenent's statement.)

---

४५. वैदिकाचार्य म्हणतातः-बौद्धाचार्य, आम्ही जसें म्हणतों तसें वेदवाक्यांत वर्णन केलें आहे. तें वेदवाक्य कोणतें म्हणाल तर हें पहा. "देव रे स्विष्टकृत नांवाच्या अग्नीला बोलले. बाबा, आमचा हव्यभाग ने. तो म्हणाला---माझा भाग असावा असा वर मागूं कां? ते म्हणाले वर माग. तो म्हणाला ( पुरोडाशाच्या ) मागील अर्धांतून मजकरितां एक वेळ एक वेळ अवदान घ्या." बौद्धाचार्य, या वेदवाक्यांत 'एक वेळ' 'एक वेळ' अशीं पदें आलीं आहेत. त्यांच्या सामर्थ्या-

45. The Vaidikâchârya observes :—" Bouddhâchârya, I have some foundation for my statement in the Veda, see the text I quote." "Oh, gods said to the Svistakrit Agni—convey our offerings : He said:—may I ask for a boon—let there be my share (of the sacrificial offering)? They said—ask a boon : He said—from the latter half itself he may cut up once, once, (an offering for me)." Bouddhâchârya, you notice the word *once* repeated in this Vedic text. The significant power of this repetition shows that the residues of the three Purodâsha-cakes are to be

सूत्राणि.

**मुख्याद् वा पूर्वकालत्वात् ॥ ४७ ॥ ( सि० ) ॥**

**भावार्थः ।** पूर्वकाले प्रधानहविःप्रदानसमये यः प्रथमो यो द्वितीयो यस्तृतीय इति यो गृहीतपूर्वः क्रमः तेनैव क्रमेण तेषां प्रथमादीनां ग्रहणं । गृहीतपूर्वक्रमस्य भंगे कारणं नास्ति । छंदतो न व्यतिक्रमः करणीयः ॥

## पुरोडाशविभागस्य भक्षतार्थाधिकरणम् ॥

**भक्षाश्रवणाद् दानशब्दः परिक्रये ॥ ४८ ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः ।** येन वेदवाक्येन ब्रह्मणे होत्र आग्नीध्राय च हविःशेषा दीयंते तस्मिन् वेदवाक्ये भक्षणार्थं ते दीयंतामिति नोक्तं । तस्मादेतेन दानेन ब्रह्मादीनामृत्विजां भृत्यत्वेन परिक्रयो भवति । कुतः । य एव श्रुतस्योत्सर्गे दोषः स एवाश्रुतपरिकल्पनायामिति शबरः । तस्मात् ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

इदं ब्रह्मणः । इद॑ होतुः । इदमध्वर्योः । इदमग्नीधः । तै० ब्रा० ( ३.३,८,८. ) ॥

वरून निरनिराळ्या पुरोडाशांतील जे राहिलेले अवशिष्ट भाग त्यांच्या योगानें स्विष्टकृत कर्म साधावें.

४६. आर्यांच्या संप्रदायामध्यें आणि वेदामध्यें विरोध आहे असें दाखविण्याकरितां बौद्धाचार्य झटतात. ते पुनः असं म्हणूं लागले. वैदिकाचार्य, तुम्ही स्विष्टकृताच्या संबंधानें इतके वेळ जें बोललां तें जरी पतकरलें तरी या स्विष्टकृत कर्माच्या संबंधानें अव्यवस्था आहे ती आहेच. तीन पुरोडाशांतून स्विष्टकृताकरितां अवदान घ्यायाचें. कां होईना. तीन पुरोडाश आहेत त्यांतून

used in the subsidiary simple sacrifice known as Svi*s*ta*k*rit.

46. The Bouddhâchârya seeks to establish that the injunctions of the Vedas conflict with the customs and practices of the Âryas. He observes :—"Vaidikâchârya, all your arguments advanced to prove the necessity of the svi*s*ta*k*rit-simple-sacrifice, have not convinced me of there being no confusion about it. You say that the offerings for the svi*s*ta*k*rit-simple-sacrifice are to be taken from the three Purodâsha-cakes prepared for the main sacrifice. I grant this. Again, the three Purodâsha-cakes may be

**४७. तसें नव्हे; मुख्यांतून प्रथम अवदान घ्यावें. कारण कालक्रमानें तो पूर्वी आहे. (सि०)**

47. Not so; the first offering is to be taken from the principal Purodâsha, because of its being first in order of time. (Final statement.)

**भक्षाचें प्रयोजन साधावें म्हणून पुरोडाशाचा विभाग हा विचार.**

THE SUBJECT OF THE DIVISION OF THE PURODÂSHA-CAKE SERVING THE PURPOSE OF ITS BEING EATEN.

**४८. भक्षाचें वेदांत स्पष्ट वर्णन नसल्यामुळें दान शब्दाचा अर्थ विकत घेणें (असा करावा.) (पू०)**

48. Because eating a (Purodâsha) is not mentioned in the Veda, the term *dâna* (is used in the Veda) in the sense of a purchase. (Opponent's statement.)

---

हा पहिला पुरोडाश, हा दुसरा पुरोडाश आणि हा तिसरा पुरोडाश अशी त्यांची निरनिराळ्या रीतीनें व्यवस्था करतां येईल. मग अमकाच पहिला, अमकाच दुसरा, अमकाच तिसरा असा क्रम राहणार नाहीं. पण असा क्रम आर्य संप्रदायाप्रमाणें ठेवावा लागतो, त्याला वेदाचा आधार आहे कोठें? म्हणून वेदामध्यें आणि आर्यसंप्रदायामध्यें विरोध आहे. आमचें म्हणणें असें आहे कीं, केव्हां कां स्विष्टकृत कर्म करायाचें असेना? अमुक पहिला, अमुक दुसरा, अमुक तिसरा अशा क्रमाकडे लक्ष देण्याची आवश्यकता नाहीं. यजमानाच्या मनास वाटेल तो पहिला पुरोडाश. त्यांतून प्रथम स्विष्टकृताकरितां अवदान घ्यावें. आर्यांनीं हवें तसें वागावें हें दाखविण्यावर बौद्धाचार्यांचा

allowed to be taken in a particular order, such as, this Purodâsha-cake is the first, and this another is the second, and this, the third Purodâsha-cake. But this order admits of being changed. Then some other Purodâsha would be first. Thus the three Purodâsha-cakes would be arranged in different orders. A particular Purodâsha cannot be fixed upon as the first or the second or the third. But the Âryas consider it to be their established custom to recognize one order as fixed. Where is the foundation for this in the Veda? Hence the customs of the Âryas conflict with the Vedas. I state, therefore, that no matter when the Svi*s*t*a*kr*i*t subsidiary simple sacrifice is performed, no particular order as to taking offerings from the Purodâsha-cake need be recognized; and that the sacrificer may take the first offering for

र्थींचें निरूपण आश्वलायन गृह्य-सूत्रांत साद्यंत केलें आहे. या शाळांमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, यांच्या मुलांस जाण्याचें चुकत नसे. सर्वांच्या हातून विद्या शिकण्याचे श्रम होत नसत. म्हणून कांहीं नुसते दहा बारा वर्षं आचार्यापाशीं रहात मात्र. आणि स्नातक ही पदवी संपादित. हे व्रत-स्नातक. दुसरे कांहीं विद्येमध्यें निष्णात होऊन पुष्कळ दिवसपर्यंत या शाळांमध्यें अभ्यास करीत रहात असत. आर्यजनामध्यें दोन संबंधाची योग्यता मोठी असे, असें पाणिनीनें वर्णन केलें आहे. जशी मातापितरांची योग्यता तशीच आचार्यांची योग्यता. शाळांवरून मंडळीचीं नांवें पडत. जसें, भरद्वाजापाशीं शिकलेली सर्व मंडळी भारद्वाजीय. अशा मंडळ्यांचें वर्णन पतंजलीच्या महाभाष्यांत पुष्कळ आलें आहे. बौद्धधर्म अझून उत्पन्न झाला नाहीं. आर्यजनामध्यें अझून दुफळी माजली नाहीं. अशा प्रसंगीं बुद्धिवाद करणारी मंडळी उत्पन्न झाली. ते काय म्हणत, आणि त्यांची वाद करण्याची पद्धति कशी होती, याचें निरूपण यास्काचार्यांनीं आपल्या निरुक्तांत केलें आहे. त्यावेळीं ह्या बुद्धिवाद करणाऱ्या मंडळीमध्यें कौत्साचार्य पुढारी होते. एकाच शाळेमध्यें आणि एकाच मंडळीमध्यें कांहीं आर्य बुद्धिवाद करणारे असत. त्यांस आम्ही बौद्धाचार्य असें नांव दिलें आहे. जे वैदिक परंपरेस अनुसरून वेदाचें आणि आर्य-संप्रदायाचें प्रतिपादन करीत, त्यां-

hma*n*a, Ksatriya; or Vaishya, must attend such a school, and pass through a regular course of studies; but every Âryan youth either for want of abilities or means, could not go through such a course. Hence some only stayed with their preceptor and secured the degree of Snâtaka. These were known as Vrata-snâtakas or honorary graduates; others stayed at these schools, zealously and devotedly studying for years. Two relationships were particularly valued by the Âryas—relationships which affected ancient sanskrit idiom as the sûtras of Pâ*n*ini show. The preceptors were as honored as parents themselves, and the Âryas obtained a name from the preceptor under whom they studied. For instance, all those who studied under Bharadvâja, were known as Bhâradvâjîyas. Such societies are frequently mentioned in the Mahâbhâsya of Patanjali. As yet, the Buddhistic system of thought or creed was not known and did not divide the ancient Âryan society into two sections. Under these circumstances the rationalistic thinkers appeared. Their method of argument and the nature of their opposition are discussed by Yâska in his Nirukta. The rationalistic opponents at the time of Yâska were led by Koutsa. Among those who belonged to the same school, there were some who were rationalistically disposed; because they preferred reason to revelation. These are characterized as the Bouddhâchâryas. There were others who sought to defend the Vedic revelation and to prove that the Ve-

स आम्हीं वैदिकाचार्य असें नांव दिलें आहे. आणि वैदिकाचार्यांचा आणि बौद्धाचार्यांचा असा परस्पर संबंध असे, म्हणून बौद्धाचार्यांस वेदाविषयीं आणि आर्यसंप्रदायाविषयीं उत्तम ज्ञान असे. असे जे बौद्धाचार्य बुद्धिवाद करीत, त्यांची इतिहासदृष्ट्या योग्यता मोठी आहे, हें वारंवार सांगण्यास नको. कारण, वेदाची आणि आर्यसंप्रदायाची जितकी सूक्ष्म रीतीनें परिक्षा करवेल तितकी बौद्धाचार्य करीत; आणि निरनिराळ्या रीतींनें आणि निरनिराळ्या विषयांस उद्देशून वैदिकाचार्यांशीं वाद चालवीत. या तिसऱ्या अध्यायामधील श्रुति, लिंग, वाक्य, स्थान, प्रकरण आणि समाख्या हीं वाक्यार्थ-मीमांसेंतील मुख्य प्रमाणें, हें वैदिकाचार्य आणि बौद्धाचार्य या दोघांसहि मान्य आहे. पण त्यांची योजना करतांना मतभेद मोठा पडे. असा मतभेद करणारी मंडळी आर्यांच्या सर्व शाळांमध्यें असे. आणि सर्व आर्यावर्तभर या शाळा असत, म्हणून कोणी एकच वैदिकाचार्य होता, आणि एकच बौद्धाचार्य होता, असें समजणें प्रशस्त नाहीं. प्रत्येक शाळेमध्यें कांहीजण वैदिकाचार्य असत आणि कांहीजण बौद्धाचार्य असत, आणि शेंकडो शाळांमध्यें हा वादविवाद चाले. शंका काढणारे हि पुष्कळजण आणि त्यांचें समाधान करणारे हि पुष्कळ. असे दोन्ही पक्षाचे जे वादविवाद होत ते जैमिनीच्या पूर्वमीमांसेमध्यें एकत्र करून ठेवले आहेत. केव्हां केव्हां वैदिका-

das were a perfect code of ethics and religion. These are characterized as the Vaidikâchâryas. Because the Bouddhâchâryas and the Vaidikâchâryas were related in this way, the latter had ample opportunities of acquiring that thorough knowledge of the Vedas and of the Âryan customs which they exhibit in the system of the Pûrva-Mîmânsâ. We need not repeat that the historical importance of these rationalistic controversies is great; because the Bouddhâchâryas argued with the Vaidikâchâryas in different ways and on different subjects, critically scrutinizing important Vedic texts and Âryan customs. The exegetical principles—such as direct signification, inferential significance, syntactical power, collocation, context and an authoritative adjustment—are accepted by both. But they differed from each other in applying these principles. There existed a small number of such dissenters in every Âryan school; and there were such schools throughout Âryâvarta. It is not, therefore, to be supposed that there was only one Vaidikâchârya and one Bouddhâchârya. In every school there were some Vaidikâchâryas and some Bouddhâchâryas—some conservatives and some reformers—and in hundreds of schools such controversies were carried on. Thus there were hundreds of those who raised objections against the Vedas and Âryan customs, and there were hundreds also who sought to defend them. These controversies are faithfully described in the Pûrva-Mîmânsâ-

चार्यांचा आपआपसांत मतभेद पडे. या मतभेदाचा उल्लेख हि पूर्वमीमांसेंत झाला आहे. एकाच वेदवाक्याची व्यवस्था करतांना, किंवा एकच वैदिक संप्रदाय स्थापन करतांना दोन तीन वैदिकाचार्यांचीं दोन तीन मतें निरनिराळीं पडत. यास दृष्टांत, ऐतिशायनाचार्याचें एक मत, दुसऱ्या आचार्यांचे दुसरें मत. तसेंच शेषाचें बादरीनें एक लक्षण केले आहे, आणि जैमिनीनें दुसरें केलें आहे. असा मतभेद परस्पर बौद्धाचार्यामध्यें हि असे. म्हणून केव्हां केव्हां एकाच विषयास उद्देशून एकच सिद्धांत स्थापन करायाचा असतां निरनिराळे पूर्वपक्ष अढळतात. आणि या पूर्वपक्षापासून पुढें बौद्धधर्म उत्पन्न झाला; आणि या वैदिकाचार्यांच्या खंडन-पद्धतीनें बौद्धधर्मास वळण लागलें, बौद्धधर्म स्वरूपास आला, आणि सारा बौद्धधर्माचा आकार या वादविवादावरून ठरला, आणि या वादविवादावरूनच आर्य-संप्रदाय बदलून, आर्यांच्या सामाजिक, धार्मिक आणि राजकीय स्थितीमध्यें मन्वंतर झालें. म्हणून या मन्वंतराचा इतिहास नीट समजण्या करितां बौद्धाचार्यांमधील आणि वैदिकाचार्यांमधील वादाचें स्वरूप नीट समजलेंच पाहिजे.

तिसऱ्या अध्यायाच्या पांचव्या पादांत जो वादविवाद झाला, त्याचें रहस्य असे कीं आर्यांच्या संप्रदायामध्यें यज्ञाची योग्यता फार मोठी असे. काय जो आनंद तो यज्ञ करतांना. काय जी

system of Jaimini. Sometimes the Vaidikâchâryas differed among themselves. This difference is also pointed out by Jaimini. In adjusting the interpretation of the same Vedic text or in defending the same Âryan custom, the Vaidikâchâryas dissented among themselves. Thus Aitishâyanâchârya proposes one adjustment of some Vedic texts, while other Vaidikâchâryas differed from him. In like manner, Bâdari offers one definition of a subordinate quality, while Jaimini offers another. Such a difference of opinion existed also among the Bouddhâchâryas, the dissenters from the Vedic polity. Hence different objections opposed to one another in their tenour are raised in connection with the same subject. Thus these objections of the Bouddhâchâryas gradually paved the way for the doctrines of Buddhism, and the opposition moulded these doctrines. Thus the Buddhistic polity originated and assumed a shape; and these controversies led to a social, religious and political revolution of Âryan society. For a proper appreciation of this revolution, from an historical point of view, the knowledge of these controversies is essential.

Now this controversy, as described in the fifth Chapter of the Third-book, is to be explained. In the Vedic polity, a sacrifice and its performance occupied much attention. All the festivity, that the ancient Âryas were capable of, was evinced on the occasion of a sacrifice. Their feeling of honour was gratified, they acquired reputation, and they

प्रतिष्ठा ती यज्ञ करतांना. काय जो लौकिक तो यज्ञ करणारांना. काय जो धर्म तो यज्ञ. असें आर्यांस वाटे. असें कां असावें, हें दाखविलें पाहिजे. कोणतीहि चाल किंवा परिपाटी मोठ्या प्रसंगापासून उत्पन्न होते. आर्य लोक जेव्हां हिंदुस्थानामध्यें शिरले, तेव्हां त्यांची यज्ञावर श्रद्धा होती. ते यज्ञ कोणते? दर्शपूर्णमास आणि अग्निष्टोम. यांच्या उत्पत्तीचा प्रकार आम्हीं पूर्वी वर्णिला आहे. हिंदुस्थानांतील अनार्य लोक यज्ञ करीत नसत. त्यांची सामाजिक स्थिति हि सुखाची नव्हती. सर्वत्र आर्यांचा उत्कर्ष असे; अनार्यांची हलाखी असे. असें कां असावें, याचा जेव्हा आर्य विचार करीत, तेव्हा त्यांस असें वाटे कीं आपणामध्यें आणि अनार्यांमध्यें भेद काय तो इतकाच कीं आपण यज्ञ करतों आणि अनार्य यज्ञ करीत नाहींत; आणि आपला जो उत्कर्ष होतो त्याचें सर्व कारण यज्ञ. पुढें होतां होतां यज्ञावर त्यांची श्रद्धा इतकी दृढ झाली कीं यज्ञावांचून त्यांस कांहीं सुचेना. कांहीं करणें झालें म्हणजे ते प्रथम यज्ञ करीत. दर्शपूर्णमास आणि अग्निष्टोम हे यज्ञ एकीकडे राहिले. आणि त्यामध्येंच कमी जास्ती करून नाना प्रकारचे नवे यज्ञ उत्पन्न झाले. त्यांस विकृति असें म्हणूं लागले. हे यज्ञ करायाचे तरी केव्हां, असा विचार करूं लागलें असतां कांहीं यज्ञ आपली कामना सिद्ध व्हावी म्हणून करीत. कांहीं यज्ञांच्या योगेंकरून अंतःकरण

felt piety when they performed sacrifices. The rationale of such a social condition deserves to be investigated. A national custom or a social institution originates, as we have already stated, in a social crisis or revolution. When the Âryas entered India, they had great faith in the efficacy of sacrifices. These were—the new and the full moon sacrifices and the Jyotis*stoma*. We have explained at length the circumstances of their origin. The ancient non-Âryas in India did not perform any sacrifice, nor was their social and political condition prosperous. Everywhere the Âryas triumphed over them. Everywhere the non-Âryas quailed before them. When the Âryas thought of their superiority and attempted to explain it, they invariably came to the conclusion that they essentially differed from the non-Âryas inasmuch as the latter never performed any sacrifice, and that their superiority was due to their performance of sacrifices. Their continued prosperity confirmed them in this belief, and they began to concentrate all their energies upon the performance of a sacrifice. They never undertook to do anything without performing a sacrifice. Sacrifices multiplied, the original new and full moon sacrifices and the Jyotistoma underwent important changes and gave way to a variety of new sacrifices known as modified sacrifices. The question is—when was such a variety of sacrifices performed? Some sacrifices were performed for accomplishing worldly objects.

शुद्ध होतें असें ते मानीत. कांहीं मध्यें केलेल्या पापाचें निराकरण व्हावें असा हेतु असे कांहीं मध्यें आपला उत्कर्ष जनास दाखवावा, असा आर्यांचा मनोदय असे. अनावर्षणादि जीं संकटें येईत तीं टाळण्याकरितां यज्ञ करीत. शत्रूचा नाश व्हावा म्हणूनहि ते यज्ञच करीत. सर्व प्रकारें कांहीं करणें झालें म्हणजे यज्ञाची योजना. अस्तु. हा सर्व प्रकार पाहून यज्ञापासून निरनिराळीं कार्यें कशीं उत्पन्न होतील, असें बुद्धिवाद करणाऱ्यांस वाटू लागलें, आणि या यज्ञकर्मास ऋषिप्रणीत ग्रंथांचा आधार किती आहे याची ते चौकशी करूं लागले. त्यांच्या असें दृष्टीस पडलें कीं वेदामध्यें आणि आर्यांच्या सप्रदा यामध्यें विरोध आहे. या विरोधाविषयीं प्रमाण दृढ व्हावें म्हणून त्यांनीं नाना प्रकारचे विरोध दाखविले. या पादामध्यें त्यांनीं शेषकर्माचा विचार केला. शेषकर्म म्हणजे कोणतीं ? ब्रह्मा नांवाच्या ऋत्विजास प्राशित्र नांवाच्या पात्रामध्यें कांहीं पुरोडाशाचा अंश घालून पिण्यास द्यायाचा. हें एक. दुसरें, ऋत्विज मंडळीस पुरोडाशाचा अंश भक्षण करण्यास द्यायाचा. याचें नांव इडाभक्षण. तिसरें, यज्ञ चांगला समाप्त व्हावा म्हणून अग्नीस विशेष आहुति देत. म्हणून त्या अग्नीचेंच नांव स्विष्टकृत् असें पडलें असे. हीं शेषकर्में करतांना पुरोडाशाची योजना करीत.* या शेषकर्माचें खंडन व्हावें म्हणून पुरोडाशाच्या बदला धुवाज्याची

They thought, that some could purify their hearts and that others could expiate the sins they had committed. They performed some sacrifices to show off their prosperity to their neighbours. National calamities, such as a drought, were sought to be averted by means of a sacrifice. They performed a sacrifice for humbling their enemies. In short, a sacrifice was an all-powerful remedy for all mishaps in domestic, social and political life. In view of this predominance of sacrificial practices supposed to produce any effect whatever, the Bouddhâchâryas or rationalistic thinkers began to enquire as to what foundation these practices had, and how they could produce the effects attributed to them. They investigated all the literature supposed to constitute the authoritative revelation by the populace and came to the conclusion that the authoritative revelation and the practices and customs of the Âryas essentially conflicted. The consequence of this was—a controversial spirit was developed. The whole society was divided into two sections—the Bouddhâchâryas and the Vaidikâchâryas. The Bouddhâchâryas pointed out important discrepancies between the Vedas and the Âryan practices and attacked the existing social order, urging as many objections as they could. The subject of the controversy in the chapter under consideration is connected with what is called residual sacrificial acts. These are—1. Some portion of a Purodâsha-cake put in a sacrificial vessel, was to be given to

योजना कां करूं नये, असें बौद्धाचार्यांनीं विचारलें. या वादाचें रहस्य इतकेंच कीं धुपाज्याची योजना पुरोडाशासारखीच आहे; आणि असें स्थापन करण्यास वेदवाक्याचाहि आधार आहे. वैदिकाचार्यांनीं या कोट्यांचें निवारण केलें. पुढें वादाचें रूप पालटून बौद्धाचार्य असें म्हणूं लागले कीं, कांहीं यज्ञामध्यें शेषकर्मं करायाचीं आणि कांहीं यज्ञांत शेषकर्मं करायाचीं नाहींत, हें कसें? साकंप्रस्थाय्य यज्ञामध्यें शेषकर्मं करायाचीं नाहींत. सौत्रामणीयज्ञामध्यें शेषकर्मं करायाचीं नाहींत. सर्वपृष्ठेष्टिमध्यें एक वेळ शेषकर्में करायाचीं. हें कसें? असें बौद्धाचार्यांनीं विचारलें असतां वैदिकाचार्यांनीं त्यांचे समाधान केलें. पुढें या पुरोडाशाच्या अंशाचें कोणी कोणी भक्षण करावें असा वाद उत्पन्न झाला. सोमरसानें पेले यज्ञामध्यें भरून ठेवीत. त्यांतील कांहीं सोमरसाचें हवन करायाचें, आणि कांहींचें पान करायाचें. याविषयीं वाद उत्पन्न झाला. अस्तु. या वादाच्या संबधानें तेहतिसाव्या सूत्रीं पूर्वपक्षकारानें 'अव्यक्त' शब्दाचा उपयोग केला आहे. या अव्यक्त शब्दाचा अर्थ शबरस्वामीनीं 'सामान्य निमित्त' असा केला आहे. इतिहासदृष्ट्या या शब्दाची योग्यता मोठी आहे. कारण अव्यक्त हा शब्द योग आणि सांख्य शास्त्रामध्यें विशेषतः येतो. प्रकृति दोन प्रकारची आहे. एक व्यक्त आणि दुसरी अव्यक्त. अव्यक्त शब्दाच्या उपयोगावरू-

the Brahmâ-priest as his sacrificial food: 2. Another portion of a Purodâsha-cake was to be given ceremoniously to the other priests; 3. Special oblations to be thrown into a sacred fire that the whole sacrifice might be properly concluded; the sacred fire itself being called Svi*s*tak*r*it—good sacrifice-maker. These three are called Prâshitra-hara*n*a, I*d*â-bhaksa*n*a and Svi*s*tak*r*it. In performing these, portions of the main sacrificial cake were used. The Bouddhâchâryas attacked this sacrificial procedure, urging that more clarified butter stored up might be substituted for a Purodâsha-cake. The secret of this controversy is—that the clarified butter and the Purodâsha-cake were equally important in a sacrifice and that they had equal authority from the Vedas. The Vaidikâchârya replied to their opponent as powerfully as he could. Gradually the Bouddhâchârya changed his position and urged that in some sacrifices the Purodâsha-cake was sanctioned by the Vedas, and that in others it was not. These sacrifices were—Sâkamprasth*â*yya, and Soutrâma*n*î. The Bouddhâchârya asked—how are these residual acts performed only once in the Sarvapri*s*t*h*a-sacrifice? The controversy was continued; the Vaidikâchârya replying to the objections and the Bouddhâchâryas urging them. The title of some priests to a Purodâsha-cake is vehemently discussed. In a Jyoti*s*toma-sacrifice, cups of Soma-juice were arranged. From some, juice was offered into a fire and others were drunk. Suffice it to remark that a controversy upon this subject took place. In this

न सांख्यशास्त्राच्या धोरणावर या शब्दा-
चा अर्थ बसला नव्हता असें म्हणण्यास
चिंता नाहीं.

पुढें सोमरस कोणी प्यावा आणि
कसा प्यावा, असा जो वाद झाला,
त्याचें स्वरूप सोमरस पिण्याच्या पद्ध-
तीचें वर्णन केलें म्हणजे सहज लक्षांत
येईल. सोमरसानें पेले भरून ठेवले
म्हणजे ऋत्विजमंडळीनें बसायाचें.
पुढें कोणी सोमरस प्रथम प्यावयाचा या-
विषयीं वाटाघाट होई. अध्वर्युकडे सर्व
यज्ञाची खटपट करण्याचे काम असे.
म्हणून एक प्रकारें त्याची योग्यता मोठी.
होत्याकडे प्रथम मंत्र म्हणण्याचा अधि-
कार असे. परंतु केवळ हस्त क्रियेपेक्षां
बुद्धीची योग्यता मोठी, म्हणून होत्यानें
प्रथम सोमरस प्यावा, असा प्रचार असे.
उगीच सोमरसाचा पेला घेऊन तोंडाला
लावीत नसत. समारंभानें सोमरस
प्यायाचा. एक ऋत्विज दुसऱ्यास म्हणे
कीं घ्या हो घ्या. त्यास दुसरा उत्तर
देई कीं ठीक. यास संस्कृतामध्ये अनु-
ज्ञा आणि प्रतिवचन अशी नावें आहेत.
असें झाल्यावर सर्वच सोमरस पीत. तो
एकमेकाचा उष्टा असला तरी चिंता
नाहीं. एका पात्रांतून सर्वजण सोम
पीत. या प्रचारास अनुलक्षून बौद्धाचा
यांचा आणि वैदिकाचार्यांचा या पादांत
वाद झाला आहे. स्वतः यजमानानें
मंत्र म्हटले, आणि यज्ञ केला, तथापि
सोम पिण्याचा अधिकार होत्याला असे.
तो त्याचा हक्क. प्रवर शब्दाचा सूत्रामध्यें
उपयोग केला . आहे तो इतिहासदृष्ट्या

connection the term *avyakta* is used in the thirty-third sûtra. Shabara interprets it into a common cause. This use of the word is historically important; because it is particularly used in the Sânkhya and Yoga-systems of philosophy which recognize that the essential modifying power called *prakriti* is of two kinds—phenomenal (vyakta) and noumenal (Avyakta). The use of the word *avyakta* in this sense warrants the conclusion that its sense as used in the Sânkhya or Yoga philosophy was not yet fixed.

The next point discussed was —who was entitled to a Soma-drink and how was it to be drunk? The description of the manner, in which Soma was drunk, will throw light upon this discussion. As soon as the jars of Soma-juice were arranged, the priests took their seats. The question then was, who was to drink the Soma-juice first? The Adhvaryu-priest claimed the first rank; because he had to bear the brunt of all the labour of performing a sacrifice. But the Hotâ also claimed the first rank, because repetition of mantras, being mental labour, was more important than mere manual performance of a sacrifice. A cup of the Soma-juice was not at once quaffed; it was to be ceremoniously drunk. One priest had to invite another to drink it. The other had to ceremoniously reply and give his consent. These acts are respectively called in Sanskrit *anujnâ* and *prativachana*. When this was done, all commenced to drink the Soma-juice. They all drank from the same cup and did not care

लक्ष देण्याजोगा आहे. प्रवर म्हणजे ऋत्विजांस आमंत्रण करणे इतकाच अर्थ आहे. म्हणून प्रवर म्हणजे प्राचीन ऋषिकुळ असा सूत्रांत अर्थ होत नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य यामध्यें यज्ञ सबधानें प्राचीन काळीं तंटा पडला होता. त्याचा थोडा वृत्तांत देऊन हा उपसंहार पुरा करायाचा. त्या तंटयाचें स्वरूप ऐतरेय ब्राह्मणांतील सप्तम पंचिकेंतील सव्विसाव्या खंडावरून कळेल. त्याचें भाषांतर एणेंप्रमाणे "यानंतर पुढें यजमानाला यज्ञभाग मिळण्याविषयीं विचार. तत्संबधीं कोणी ब्रम्हवादी म्हणतात, क्षत्रिय यजमान असतां त्यानें आपला यज्ञभाग सेवावा कीं न सेवावा. यावर उत्तर असें आहे, जर यज्ञभागाचें त्यानें सेवन केलें तर असें सेवन करण्यास त्यास अधिकार नसतां, त्यानें यज्ञ सबधीं हवन केलेलें द्रव्य खाल्लें, म्हणून तो मोठा पापी झाला. बरें, जर यज्ञभाग सेवन न केला तर त्याला यज्ञ अंतरला. का तर यज्ञ आणि यजमानानें सेवन करण्याचा यज्ञभाग दोन्ही एकच, म्हणून ब्रह्मा नांवाच्या ऋत्विजास तो यज्ञभाग द्यावा. ब्रह्मा ऋत्विज म्हणजे क्षत्रियाच्या पुरोहिताच्या स्थानीं बरें. पुरोहित म्हणजे अर्धा क्षत्रियच असें म्हटले आहे. दुसऱ्यानीं यज्ञभाग खाल्ला असतांच (क्षत्रियानें) तो खाल्ला असा होतो. क्षत्रियाला प्रत्यक्ष भक्ष नाहीं. ब्रम्हा नांवाचा ऋत्विज हाच काय तो त्याचा प्रत्यक्ष यज्ञ. कारण ब्रम्हा नांवाच्या ऋत्विजाच्या ठायीं यज्ञ

for any pollution arising from so doing. This is the subject examined by the Bouddhâchârya and the Vaidikâchârya in this chapter. Though the sacrificer performed the sacrifice himself, yet the Hotâ-priest was entitled to a Soma-drink as a matter of right. The term *pravara* is used in the sûtra. The term is historically important; because as used in the sûtra, it simply means invitation to a priest; and it does not mean a family of an ancient *Ri*si. At the time of which we are writing, the Brâhma*n*as, Vaishyas and Ksatriyas disagreed among themselves in sacrificial matters. We will close this summary with a short description of this disagreement, the nature of which is revealed in the Section (VII 26.) of the Aitareya-Brâhma*n*a. Its translation is as follows :—" Now then the subject of the sacrificial portion of a sacrificer Some Brahmavâdins ask when a K*s*atriya, performs a sacrifice, can he take his sacrificial portion or not ? The reply to this is, if he took the sacrificial portion, he ate the sacrificial portion to which he is not entitled He is, therefore, a great sinner. Well, if he did not take a sacrificial portion, he did not perform a sacrifice. Because a sacrifice and the sacrificial portion to be taken by the sacrificer are one and the same. The sacrificial portion, therefore, is to be given to the Brahmâ-priest. Mark, the Brahmâ-priest is in the place of the chaplain of a sacrificer. It is said that the chaplain is, as it were, half a Ksatriya. The Ksatriya eats the sacrificial portion, when some one for him (Brahmâ) eats it. A

काय तो आश्रय धरून राहिला आहे. यज्ञ हाच यजमानाचा आश्रय. म्हणून जसें पाण्यांत पाणी टाकलें म्हणजे मिळून जातें, अग्नींत अग्नि टाकला म्हणजे मिळून जातो, वरती उचंबळून येत नाहीं, तसाच ब्रम्हा हा यज्ञ, त्यास जें यजमानानें खावयाचें तें दिलें म्हणजे ( सर्व व्यवस्था नीट होते. ) यजमानाचें नुकसान होत नाहीं. म्हणून यजमानाच्या वाटणीचा यज्ञभाग ब्रम्हा या ऋत्विजास द्यावा. कोणी ऋत्विज पुढें लिहिलेला मंत्र म्हणून अग्नींत यज्ञभाग टाकतात "चोहोंकडे प्रकाशणारा प्रजापति म्हणून एक लोक आहे, त्यामध्यें तुझें स्थापन करतो, म्हणजे यजमानाचा आणि तुझा संयोग घडेल. स्वाहा. पण असें करूं नये. यजमानानें खाण्याचा यज्ञभाग आणि यजमान दोन्ही एकच. यज्ञभागाला अग्नींत टाकावा, असें जो म्हणतो तो यजमानाला अग्नींत टाकतो. असें करतांना कोणी ऋत्विजास पाहिलें असतां त्यास सांगावें, बाबा, तूं यजमानास अग्नींत टाकलास अग्नि त्याचे प्राण दहन करील. असें खास घडतें. म्हणून अशी इच्छा करूं नये, अशी इच्छा करूं नये. " ऐतरेय ब्राम्हणाच्या या खंडांत तीन गोष्टी आल्या आहेत, त्यांचा परस्परांशीं संबंध आहे. प्रथम क्षत्रिय यजमानाचा आणि यज्ञाचा तर संबंध राहिला पाहिजे. जोंवर हा संबंध आहे, तोंवर ब्राम्हणांचा आणि क्षत्रियांचा संबंध आहे. हा संबंध तुटला कीं, ब्राम्हणाचा आणि क्षत्रियाचा संबंध तुटला. आ-

Ksatriya personally can not eat it. The priest Brahmâ is the real sacrifice for the Ksatriya because the sacrifice is in the Brahmâ-priest. A sacrifice affords shelter to a Ksatriya. Hence as water thrown into water unites with it, and as fire thrown into fire unites with it, but does not overflow, in like manner, Brahmâ is a sacrifice, when the sacrificial portion of the sacrificer is given to him (the whole is duly performed) and the sacrificer is not injured. The sacrificial portion, therefore, to be given to a Ksatriya-sacrificer, ought to be given to the Brahmâ priest. Some priests recite mantras and throw the sacrificial portion into a sacred fire. The translation of the mantra is—"there is a region of the name of Prajâpati. I establish thee there: then thou wilt be joined with the sacrificer. Svâhâ. But this procedure is not correct. The sacrificial portion to be eaten by the sacrificer and the sacrificer are one and the same thing. He that states that the sacrificial portion ought to be thrown into a sacred fire, throws the sacrificer into a sacred fire. If any body should see a priest doing this, he should tell him—well, thou hast thrown the sacrificer into the sacred fire, which will burn his life (Prâna). This verily takes place. Therefore, this is not to be desired, this is not to be desired." This translation brings to light three points—first, it is necessary to maintain a relationship between a Ksatriya-sacrificer and a sacrifice. So long as this relationship exists, the Brâhmanas are necessarily connected

णि असा संबंध तुटला असतां क्षत्रिय एकिकडे आणि ब्राम्हण एकिकडे. असें होऊन सामाजिक व्यवस्था बिघडेल पुढें जेव्हां बौद्ध लोक धुरंधर झाले तेव्हां त्यांनीं आम्हास यज्ञ नको, एथूनच वाद करण्यास प्रारंभ केला. यावरून प्राचीन आर्यांच्या राजकीय व्यवस्थेची गुरुकिल्ली म्हटली म्हणजे यज्ञ. यज्ञाच्या द्वारा क्षत्रियाकडे स्वातंत्र्य राहत नसे. ही एक गोष्ट. क्षत्रियानें नित्य नैमित्तिक यज्ञ केले पाहिजेत, असें म्हटलें म्हणजे कोणी तरी विद्वान ब्राम्हणाच्या अनुषंगानें वागलें पाहिजे. म्हणून बहुतेक क्षत्रियापाशीं प्राचीन काळीं पुरोहित असत. आणि जें जे क्षत्रिय कांहीं करीत, तें तें पुरोहिताची मसलत घेतल्यावाचून कधीं करीत नसत. जशी ज्या पुरोहिताची अक्कल असेल, तसें त्या क्षत्रियाच्या दरबारांत त्याचें वजन पडे. असा हा प्राचीन ब्राम्हणाचा आणि क्षत्रियाचा यज्ञद्वारा नित्य संबंध होता. ही दुसरी गोष्ट. क्षत्रियाचें वर्चस्व कीं ब्राम्हणाचें वर्चस्व असा वाद या संबंधानें सहजच उत्पन्न होईल. यज्ञामध्यें जें कांहीं यजमानाच्या धारणीस खाण्याचें अन्न येई, तें यजमानास न मिळतां ब्रम्हा नांवाच्या ऋत्विजास मिळालें म्हणजे ब्राम्हणाचें वर्चस्व सिद्ध झालें. कारण, ब्रह्याचे स्वाधीन यज्ञ, आणि यज्ञाच्या स्वाधीन क्षत्रिय. असें ब्राम्हणाचें वर्चस्व नसावें, आणि क्षत्रियांचे यज्ञ तर साधावेत, असें बस्तान बसविण्याकरितां कोणी यजमा-

with the Ksatriyas As soon as this relationship is broken, the Brâhmanas cease to have anything to do with the Ksatriya. Aud under these circumstances, society would be involved in confusion. To proceed, when the Buddhists became powerful, they began their attack against the Vedic polity by stating that they did not want to sacrifice. This statement is important, because the first principle of Vedic political polity was a sacrifice—a sacrifice which necessitated a general dependence of the Ksatriyas upon the Brâhmanas. Secondly, the Ksatriyas had to perform necessary and occasional sacrifices, which dove-tailed into all the relations of social and domestic life, the duties of which could not be satisfactorily discharged without permanently employing a Brâhmana. Hence every Ksatriya in ancient India had a chaplain attached to his household—a chaplain who acquired a great influence over the mind of his patron. He was consulted about all matters of the Ksatriya-chieftain and his family. According as the chaplain was intelligent, he exerted his influence; and according to the power of this influence, the little court of a Ksatriya-prince either prospered or failed. Hence a chaplain was an important factor in the politics of a Ksatriya-court. Thirdly, gradually the chaplain felt his power, and the Ksatriya felt that his political views were set aside. This led to a discussion as to the relationship between the Brâhmanas and the Ksatriyas. The question was openly

न खाण्याचा यज्ञभाग अग्नीमध्यें टाकित. मग सहजच सर्व तंटा तुटला. ब्राह्मण आणि क्षत्रिय समान ठरले. तसें न व्हावें म्हणून ऐतरेय ब्राह्मणामध्यें ठराव केला आहे कीं, अग्नीमध्यें यजमानानें खाण्याचा भाग टाकूं नये. या ठरावाची राजकीय इतिहासदृष्ट्या योग्यता मोठी आहे. या गोष्टीचा विचार या पादांत झाला आहे, पण एवढ्यानें-च ब्राह्मणाचा आणि क्षत्रियाचा तंटा तुटला नाहीं. यज्ञ केला म्हणजे क्षत्रियास कांहीं पिण्यास मिळत असे. तो सोमरस त्याला मिळूं नये अशी एक दुसरी तऱ्हा काढली. याचाहि विचार या पादांत झाला आहे. तो असा. क्षत्रिय राजसूय यज्ञ करीत. क्षत्रियानें वडाच्या पारंब्याचा रस काढून त्यांत उंबरें, पिंपळाचीं फळें, आणि पिंपरीचीं फळें टाकावींत; आणि त्याचा रस तयार करून तो क्षत्रियानें घ्यावा. असें करण्याचें कारण ऐतरेय ब्राह्मणामध्यें वर्णिलें आहे. तें असें. राममार्गवेय म्हणून कोणी श्यापर्ण गोत्राचा ब्राह्मण होता, त्यानें विश्वंतर राजावर आपल्या बळानें जबरदस्ती करून, क्षत्रियांनीं सोमरस पिऊं नये, पण वडाच्या पारंब्यांचा रस प्यावा असा ठराव अमलांत आणला. या कथेवरून प्रथम ब्राह्मणाचें आणि क्षत्रियाचें वैमनस्य कसें पडूं लागलें हें दिसून येतें. असा ब्राह्मणाच्या आणि क्षत्रियाच्या संबंधाचा विचार या पादांत झाला आहे.

asked whether the Ksatriyas were superior to the Brâhmanas or the Brâhmanas were superior to the Ksatriyas. This political difficulty was obviated by the promulgation of a rule that the sacrificial food which was, properly speaking, the portion of a Ksatriya, should be withheld from him, and in his name it is to be given to a Brâhmana-priest. Thus the superiority of the Brâhmanas was secured without wounding the feelings of the Ksatriyas. Because the sacrifice was already in the power of the Brahmâ-priest, and because a Ksatriya was in the power of a sacrifice; the sacrificial portion to be eaten by a Ksatriya-sacrificer being a connecting link between the Brâhmanas and the Ksatriyas, this portion showed the inferiority of the latter to the former, when it was withheld from the Ksatriyas and given to the Brahmâ-priest. Some Ksatriya-sacrificers adopted a plan of their own for solving the difficulty. They withheld the sacrificial portion from the Brahmâ-priest, threw it into a sacred fire, and thus attempted to maintain the relationship of equality between the Brâhmanas and the Ksatriyas. To prevent this, the dictum in the Aitareya-Brâhmana—that the sacrificial portion should not be thrown into a sacred fire—was promulgated. The nature of such Vedic texts is interpreted in this Chapter. The second plan adopted by the Brâhmanas was—the Soma-juice so much valued by the Ksatriyas, was withheld from them. The Ksatriya particularly took care to celebrate

the ceremony of coronation. Instead of the Soma-juice the following preparation was given to him. The juice of the hanging shoots of a banian-tree, Indian figs, the fruits of a *Pimpala*-tree and of a *Pimpari*-tree,—all these were to be mixed up, and their juice was to be taken. This was to be given to a Ksatriya instead of the Soma-juice. The cause of this change is thus described in the Aitareya-Brâhmana. There was a Brâhmana of the name of Râma mârgaveya belonging to the family of the Shyâparnas, He forced his patron, King Vishvantara, and established that the Ksatriyas should drink the preparation instead of the Soma juice. The question of the balance of power between the Ksatriyas and the Brâhmanas of the Vedic period is elucidated by the discussions explained in this Chapter.

**४. ( उपनिषद् वाक्यामध्यें परब्रह्म ) कर्म ( आणि जीव ) कर्ता असा प्रकार अढळतो म्हणून (जीव उपासनीय नाहीं.)**

4. The grammatical construction of an Upanisad-text shows that Brahma is in the objective case, and the human spirit is in the case expressing an agent. Therefore, the human spirit is not to be worshipped.

**५. विशेष शब्दाची योजना केली आहे म्हणून ( जीव उपासनीय नाहीं. )**

5. (The human spirit is not to be worshipped), because of a particular statement (in the Upanisad-text)

४. ज्या उपनिषद्वाक्यांवर हें सूत्र बसविलें आहे, तें उपनिषद्वाक्य हें आहे. "एथून गेल्यावर ( मेल्यावर ) मी ( जीव ) त्याला ( ब्रह्माला ) प्राप्त होईन." छां० उ० ( ३.१४ ४. ) या वाक्यामध्यें ब्रह्म हें कर्म आहे. जीव हा कर्ता आहे. या वर्णनास अनुलक्षून जीव भिन्न आणि परब्रह्म भिन्न असें वर्णन सूत्रकारानें केलें आहे. उपासक जीव आणि उपास्य ब्रह्म. ब्रह्मामध्यें आणि जीवामध्यें जो उपास्य-उपासक संबंध आहे तेवढाच काय तो दोहोंतील भेदाचा आधार. अशी या सूत्राची शंकराचार्यांनीं व्याख्या केली आहे. रामानुज म्हणतात कीं जीव ब्रह्मप्राप्ति करून घेणारा-उपासक, आणि जें प्राप्त व्हावयाचें तें ब्रह्म उपास्य. नाना ठिकाणीं बादरायण जीव आणि ब्रह्म यांचा भेद आहे असें वर्णन करतात. त्या भेदाची व्यवस्था शंकराचार्य कशी करतात. हें एक दोन वेळ पूर्वी

4. The Upanisad-text referred to in the sûtra is this. "Going away from this place (after death), I (the human spirit) will attend to that (Brahma)" (Chhân. Up. III. 14, 4.) In this text the word Brahma is in the objective case, and the human spirit is in the nominative case expressing an agent. Referring to this text, the sûtra states that the human spirit is different from the Supreme Spirit. The former is the worshipper and the latter is to be worshipped. This difference between the human spirit and the Supreme Spirit is all the difference between the two as to their nature. This is the way Shankarâchârya interprets the sûtra. Râmânuja observes :—that the human spirit has to attain to Brahma and is its worshipper ; and that Brahma, which is to be attained to, is to be worshipped. Bâdarâyana, in the different sûtras, distinctly points out the difference between the human spirit and the Supreme Spirit (Brahma.) It has already been twice pointed out, how Shankarâchârya

## सूत्राणि.

### स्मृतेश्च ॥ ६ ॥

**भावार्थः ।** स्मृतिगतवाक्यान्यपि जीवब्रह्मणोर्भेदं प्रतिपादयंति ॥ तत्र यथा घटकरकाद्युपाधिवशादपरिच्छिन्नमपि नभः परिच्छिन्नवदवभासते तद्वत् । तदपेक्षया च कर्मत्वकर्तृत्वादिभेदव्यवहारो न विरुध्यते प्राक् तत्त्वमसीत्यात्मैकत्वोपदेशग्रहणात् । गृहीते त्वात्मैकत्वे बंधमोक्षादिसर्वव्यवहारपरिसमाप्तिरेव स्यादिति शंकरः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया । भ० गी० (१८.६१.) ॥ नान्योऽतोऽस्ति द्रष्टा नान्योऽतोऽस्ति श्रोता । बृ० आ० उ० ( ३.७,२१.) ॥ क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत । भ० गी० ( १३.२. ) ॥ तत् त्वमसि । छां० उ० (६.१३,३. ) ॥

आम्हीं दाखविलें आहे. त्याचा वाचकांनीं विचार करावा.

५. ती विशेष योजना कशी केली आहे? रामानुज असें म्हणतात कीं उपनिषद्वाक्यामध्यें उपासक जीवाची षष्ठी विभक्ति आहे. आणि उपास्य जें ब्रह्म त्याची प्रथमा विभक्ति. म्हणून ब्रह्म निराळें आणि जीव निराळा असा भेद आहे. तें उपनिषद्वाक्य कोणतें? "हा आत्मा माझ्या अंतर्हृदयांत आहे." अस्तु. जीव निराळा आणि ब्रह्म निराळें असा सिद्धांत वल्लभाचार्यांस पतकरत नाहीं. ते आपणास शुद्ध अद्वैतवादी असे म्हणवितात. त्यांनीं या सूत्राची व्यवस्था कशी केली आहे? ते असें म्हणतात कीं

adjusts the interpretation of these sûtras and attempts to prove his doctrine of the identity of the human spirit and the Supreme Spirit. His statement about exoteric and isoteric modes of belief deserves attention.

5. How is this particular statement made? Râmânuja observes :—the human spirit, which is the worshipper, is in the genitive case in the Upanisad-text, and that the Supreme Spirit which is to be worshipped, is in the nominative case, and infers that the human spirit is different and distinct from the Supreme Spirit. Such a statement is too much for Vallabhâchârya to bear, who is a pure and thorough non-dualist. The particular statement referred to in the sûtra

**६. स्मृतिग्रंथावरून हि (जीव आणि ब्रह्म भिन्न असें सिद्ध होतें.)**

ग्रंथाच्या प्रारंभीं जीव भिन्न आणि ब्रह्म भिन्न असें वर्णन करून, दोन्हीं एक असा सिद्धांत ग्रंथाचे शेवटीं केला आहे. म्हणून उपक्रम आणि उपसंहाराकडे लक्ष देऊन सूत्रार्थ केला पाहिजे. ह्या सूत्राच्या संबंधानें जें उपनिषद्वाक्य घेतात तें एणेंप्रमाणें. "भाताचे तांदुळा एवढा किंवा जवा एवढा किंवा साळ्याच्या तांदुळा एवढा अंतरात्म्याचेठायीं तेजोमय पुरुष आहे." श० ब्रा० (१०.४,६,२.)

६. स्मृति ग्रंथ म्हणजे कोणते? बादरायण-सूत्रावर भाष्य करतांना शंकराचार्य भारतादि ग्रंथ स्वीकारतात. मध्वाचार्य अठराहि पुराणांचें अनुसंधान करतात. ब्रह्मामध्यें आणि जीवामध्यें भेद आहे असें म्हणणें शंकराचार्यांस कधीं पतकरायाचें नाहीं. बादरायण तर आपल्या सूत्रांत भेदाचें प्रतिपादन करतात. हें कसें? शंकराचार्य याची व्यवस्था करतात ती अशी. जिज्ञासूला घटामध्यें कोंडलेलें आकाश बाहेरल्या आकाशापासून भिन्न वाटतें. परंतु वास्तविक दोन्हीं एकच आहेत. तसें वास्तविक ब्रह्म आणि जीव एकच आहे. केवळ उपाधिमुळें भेद वाटतो. ब्रह्मज्ञान होऊन ब्रह्माची खूण पटेपर्यंत असा भेद मानणें हें योग्य आहे. "सर्व भूताच्या हृदयाचे ठायीं, हे अर्जुन, ईश्वर

**6. Again (it can be shown) from smritis (that the human spirit is distinct from the Supreme Spirit).**

is this:—"This spirit (âtmâ) is in my inner heart." Vallabhâchârya adjusts this sûtra in the following way. At the beginning of his sûtra, Bâdarâyana states that the human spirit is distinct from the Supreme Spirit, and thus gradually paves the way for his final statements at the end of the sûtras about the identity of the two. Hence in thus interpreting sûtras, the beginning and the end of the system of sûtras ought to be carefully examined. The following is the translation of the Upanisad-text bearing on this subject. "There is a person full of light in the inner spirit as small as a colonum-grain, or as a barley-corn or a rice-grain." (Shatapatha-Brâhmana X. 4, 6, 2.).

6. What are these Smriti-books? In interpreting the sûtras of Bâdarâyana, Shankarâchârya mentions such works as the Mahâbhârata to be the Smritis. Madhvâchârya quotes all the eighteen Purânas. Shankarâchârya can never admit for a moment that the human spirit is distinct from the Supreme Spirit. He adjusts the distinction in this way. To a novice in Pantheistic philosophy, the æther shut up in a vessel, appears to be distinct from the universal æther about us. But really speaking, both are identical as to their nature. Thus really is the human spirit identical with the Supreme Spi-

सूत्राणि.

**अर्भकौकस्त्वात्तद्व्यपदेशाच्च नेति चेन्न निचाय्यत्वा-देवं व्योमवच्च ॥ ७ ॥**

**पदार्थः ।** अर्भकं-अल्पमोकः-स्थानं यस्य तत्त्वं अर्भकौकस्त्वं=अणीय-स्त्वं । निचाय्यत्वात्=हृदये ज्ञातुं शक्यत्वात् ॥

**भावार्थः ।** अणीयस्त्वेनात्मनो वेदे व्यवहृतत्वादात्मनो न ब्रह्मवाचकत्व-मित्युक्तं चेन् न । आत्मा तु सर्वव्यापी व्योमवत् । मननानिदि-ध्यासनार्थमणीयस्त्वेनात्मनो वर्णनं । आत्मा तु विष्णुरिति मध्वः ॥ स परब्रह्मेत्यन्ये ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

एष म आत्माऽन्तर्हृदये । छां० उ० (३.१४,३.) ॥ व्रीहिर्वा यवो वा श्यामाको वा श्यामाकतंडुलो वैवमयमंतरात्मन् पुरुषो हिरण्मयः । श० ब्रा० (१०.४,६,२.) ॥ ज्यायान् पृथिव्या ज्यायानंतरिक्षाज्ज्यायान् दिवो ज्यायाने-भ्यो लोकेभ्यः । छां० उ० (३.१४,३.) ॥ सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जला-निति शांत उपासीत । अथ खलु क्रतुमयः पुरुषो यथाक्रतुरस्मिँल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति स क्रतुं कुर्वीत । मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसंकल्प आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगंधः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽ-वाक्यनादरः । छां० उ० (३.१४,२.) ॥

वास करतो. जणों यंत्रावर चढवून आपल्या मायेच्या योगानें सर्व भूतांना फिरवतो" भ० गी० (१८.६१) यावां-चून दुसरा पाहणारा नाहीं. "यावांचून दुसरा ऐकणारा नाहीं." बृ० उ० (३.७,२१.) "सर्व शरीरामध्यें जीव म्हणून मी, असें, हे अर्जुन, जाण." भ० गी० (१३.२.) "तें तूं आहेस" छां० उ० (६.१३,३.) या वाक्याचें या सूत्रीं अनुसंधान केलें आहे.

rit. There is seemingly a distinction on account of an intervening element such as the vessel. Such a distinction ought to be recognized so long as the nature of the Supreme Spirit (Brahma) is not perfectly perceived. The following is the translation of the Smriti-texts :—"Oh Arjuna, God dwells in the hearts of all beings, and turns them by means of his delusions as if (they) were mounted upon a wheel." (Bha. Gí. XVIII. 61.) "None

**७. परमाणु सारखा लहान आत्मा आहे, असें वेदामध्यें निरूपण असल्यामुळें आत्मा ब्रह्म नव्हे असें कोणी म्हणेल तर तसें नव्हे. कारण आकाशाप्रमाणें आत्मा असून ह्रदयामध्यें त्याचें ध्यान करतां येतें.**

7. If it be stated on account of the description in the Vedas that the spirit is as small as a particle—that it is not Brahma; then this is wrong; because the spirit is (as universal) as the heavens, and is capable of being contemplated (in the recesses of) the human mind.

---

७. या सूत्रीं आत्मा अतिसूक्ष्म कसा आहे आणि विभु कसा आहे, याचें बादरायणानीं वर्णन केलें आहे. आकाशाप्रमाणें आत्मा सर्व व्यापी आहे. त्याचें मनन करतां येतें. अशा रीतीनें तो ह्रदयस्थहि आहे. म्हणून वेदामध्यें आत्म्याचें एकाच प्रकारचें वर्णन नाहीं. आत्मा अतिसूक्ष्म असून विभु आहे. तो ह्रदयस्थ असून सर्वव्यापी आहे. म्हणून जो आत्मा तेंच ब्रह्म असा सिद्धांत बादरायणानीं केला आहे. तोच शंकराचार्य स्वीकारतात. यावर मध्वाचार्य असें म्हणतात कीं, आत्मा म्हणजे विष्णु. दुसरे भाष्यकार म्हणतात कीं आत्मा म्हणजे परब्रह्म. या सूत्राच्या संबंधानें जीं उपनिषद्वाक्यें घेतलीं आहेत त्यांचें भाषांतर. "हा माझा आत्मा ह्रदयाच्या आंत आहे." छां० उ० (३.१४, ३.) "अंतरात्म्यामध्यें तेजोमय पुरुष आहे. तो भाताच्या तांदुळा एवढा किंवा जवा एवढा किंवा सांव्याच्या तांदुळा एवढा." श० ब्रा० (१०.४,६,२.)

else but he sees: None else but he hears." (Bra. Up. III. 7, 31.) "Oh Arjuna, know, I am the spirit in all bodies (human.)" (Bha. Gî. XIII. 2.) "Thou art he" (Chhân. Up. VI. 13, 3.)

7. In this sûtra Bâdarâyana admits that the spirit is at once extremely small and immensely large; and that though it is as universal as the heavens, yet it is capable of being contemplated; and that it abides in the human heart. The conclusion from these statements is that the description of the spirit in the Veda is not the same-being at once extremely small and immensely large: at once abiding in the heart and universal. The spirit is thus essential Brahma. Such is the statement made by Bâdarâyana in the sûtra and accepted by Shankarâchârya in his commentary. Upon this Madhvâchârya observes that the spirit is Visnu. Other commentators simply remark that the spirit is the Supreme Brahma. The following is the translation of the Upanisad-texts bearing on this sûtra. "This my spirit is in the heart." (Chhan. Up. III. 14, 3.) "In the inner spirit there

सूत्राणि.

**संभोगप्राप्तिरिति चेन्न वैशेष्यात् ॥ ८ ॥**

**पदार्थः ।** विशेषस्य भावो वैशेष्यं तस्माद्वैशेष्यात् ॥

**भावार्थः ।** ब्रह्मणोऽणीयस्त्वेन हृदयस्थितावंगीकृतायां तस्य सुखदुःखादिप्राप्तिः प्रसज्येतेत्युक्तं चेन्न न । किं कारणं । विशेषो वर्तते । कः स विशेषः ॥ विशेषो हि भवति मिथ्याज्ञानसम्यग्ज्ञानयोः । मिथ्याज्ञानकल्पित उपभोगः । सम्यग्ज्ञानदृष्टमेकत्वं । न च मिथ्याज्ञानकल्पितेनोपभोगेन सम्यग्ज्ञानदृष्टं वस्तु संस्पृश्यते । तस्मान्नोपभोगगंधोपि शक्य ईश्वरस्य कल्पयितुमिति शंकरः ॥ सामर्थ्यवैशेष्यात् । उक्तं हि गारुडे । सर्वज्ञाल्पज्ञताभेदात् सर्वशक्त्यल्पशक्तितः । स्वातंत्र्यपारतंत्र्याभ्यां संभोगो नेशजीवयोरिति न समानभोगप्राप्तिरिति मध्वः ॥ हेतुवैशेष्यात् । न हि शरीरांतर्वर्तित्वमेवसुखदुःखोपभोगहेतुः । अपि तु पुण्यपापरूपकर्मपरवशत्वं । तत्त्वपहतपाप्मनः परमात्मनो न संभवतीति रामानुजः ॥ वैशेष्यात् । विशेषस्य भावो वैशेष्यं तस्मात् । सर्वरूपत्वमानंदरूपत्वं स्वकर्तृत्वं विशेषः तद्भावो ब्रह्मणि वर्तते न जीव इति जीवस्यैव भोगो न ब्रह्मण इति वल्लभः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

नान्योतोऽस्ति विज्ञाता । बृ० आ० उ० (३.७,२१.) ॥ तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्योऽभिचाकशीति । मुं० उ० ( ३.१,१. ) ॥

तो पृथ्वीपेक्षां मोठा, तो अंतरिक्षापेक्षां मोठा, तो आकाशापेक्षां मोठा, तो या सार्‍या लोकांपेक्षां मोठा आहे. (ज्यापासून ब्रह्मांडाची) उत्पत्ति, स्थिति, आणि लय, तें सारें हें ब्रह्म. शांत होऊन त्याची उपासना करावी. पुढें खरेंच जीव निश्चयात्मक आहे जसा

is a person full of light: He is as small as a rice grain or as a barley-corn or husk of colonum or as a grain of colonum." (Sha. Brâ. X. 4, 6, 2.) "He is larger than the earth, larger than the firmament, larger than the heavens, larger than all the regions (Loka:) (From what proceed the creation), the stability, and

**८. सुखदुःखें त्याला आहेत असें म्हटलें तर नव्हे. कारण विशेष आहे.**

**8. If it be said that he has his pleasures and pains, then this is not so; because of his distinctiveness.**

---

निश्चय करून पुरुष इहलोकीं वागतो, त्याप्रमाणें मेल्यावर तो पुढें होतो. म्हणून त्यानें निश्चय करावा (ज्या शब्दाचा आम्ही निश्चय असा अर्थ केला तो मूळ संस्कृत शब्द क्रतु आहे.) तो आत्मा कसा आहे? निश्चय करणारा, प्राणच ज्याचें शरीर आहे म्हणजे लिंगदेहांत राहणारा. प्रकाशरूप, सत्यसंकल्प, आकाशा सारखा सर्वव्यापी आत्मा, सर्वकर्ता, सर्वांनीं ज्याची इच्छा करावी तो, सर्वगंध त्याच्यामध्यें आहेत, सर्वरस त्याच्या मध्यें आहेत, हें सारें व्यापणारा, वाणी सारखीं इंद्रियें ज्याला नाहींत, ज्याला संभ्रम नाहीं." छां० उ० (३.१४,२.).

८. मनुष्याच्या हृदयामध्यें आत्मा राहतो असें म्हटल्यानें सुखदुःखें त्याला असावींत असें पतकरावें लागेल. तर तसें नव्हे. असें सिद्ध करण्यास बादरायण काय म्हणतात त्याचा विचार केला पाहिजे. ते असें म्हणतात कीं ब्रह्मामध्यें आणि जीवामध्यें भेद आहे. ह्या भेदाचें निरनिराळे भाष्यकार निरनिराळ्या रीतीनें वर्णन करतात. शंकराचार्य असें म्हणतात कीं सुखदुःखाचें कारण ज्ञान आहे. आणि ह्या ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. एक मिथ्याज्ञान आणि एक सत्यज्ञान. मिथ्याज्ञाना-

the destruction of the world? He is all spirit (Brahma): Becoming calm, one ought to worship it: then, indeed, the human spirit is essentially discriminated. According as he conducts himself in this world and carries out his resolutions, so in the next world he obtains the fruit. He, therefore, ought to discriminate and resolve." We have interpreted the word *Kratu* in the original Sanskrit sûtra into resolution. What is the nature of the spirit? Discrimination and resolution. "Breath is his body; that is, he dwells in the fine body (Linga-deha): its form is light: its desires are truth, and it is as universal as the sky: such is the Spirit, Creator of all: to be sought by all: the seat of all fragrance, of all flavour: occupying all these, he has not got the organs like the tongue, and is free from all delusion." (Chhân. Up. III. 14, 3.)

8. When it is stated that the Spirit abides in the human heart, the plain conclusion then is that it is capable of pleasure and pain. But such a conclusion is not to be accepted. The evidence which Bâdarâyana produces in this connection deserves to be examined. He states that there is a distinction between the human spirit and the Supreme Spirit. This distinction is explained in different ways by different commentators. Shanka-

सूत्राणि.

**अत्ता चराचरग्रहणात् ॥ ९ ॥**

**भावार्थः** । परमात्मा अत्ता नाम भक्षयिता । किं भक्षयति । सर्वं चराचरं । चराचरस्य भक्षयितव्यत्वेन निरूपणादात्मन एवात्तृत्वं न तु जीवस्येति पूर्वपक्षसमाधानं । कः पूर्वपक्षः । यदि पूर्वसूत्रेण संभोक्तृत्वं नास्तीति निरूपितं कथं तर्हि वेदवाक्येष्वात्मनोऽत्तृत्वेन निरूपणं । यतः परमात्मा न सामान्यानि सुखादीनि भुंक्तेऽपि तु चराचरमात्ति नामोपसंहरतीति सूत्ररहस्यं । मृत्युसंबंधमात्रेण भगवति भोक्तरि प्रवेशार्थं योग्यरूपत्वमेवादनं च प्राणानां तत्रैव समवलयाद् मृत्युरपि तत्रैव लीनोऽग्रे जन्ममरणाद्यभावाय भगवत्येव प्रविशति । तस्मादस्मिन् वाक्ये ब्रह्मक्षत्रमृत्यूनां भोग्यत्वेन ग्रहणादत्ता भगवानेवेतिसिद्धमिति वल्लभः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदनः । मृत्युर्यस्योपसेचनं क इत्था वेद यत्र सः । क० व० ( २.२५. ) ॥ अग्निरन्नादः । ( तै० ब्रा० २.५,७,३. ) तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्योऽभिचाकशीति । मु० उ० ( ३.१,१. ) ॥

**प्रकरणाच्च ॥ १० ॥**

**भावार्थः** । पुनः वेदवाक्यानां परमात्मन्येव पर्यवसानमिति प्रकरणात् सिध्यति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

न जायते म्रियते वा विपश्चित् । क० व० ( २.१८. ) ॥

ऱ्या योगाने उपभोगाविषयीं नाना प्रकारचे तरंग मनामध्ये उठतात. अशी प्रवृत्ति जीवाची आहे. कारण जीवाच्या पाठीमागे मिथ्या ज्ञान लागले आहे. परंतु परमेश्वरापासून मिथ्या ज्ञान दूर

iâchârya states that knowledge is the cause of pleasure and pain, and that knowledge is of two kinds—false and real. The false knowledge produces a variety of fancies about enjoyments in the mind. This is the condi-

## सामान्यशास्त्रार्थः ॥

प्रकृतौ विकृतौ वा स्याद्यस्य पर्णेत्यसौ विधिः ॥ प्रकृतावेव वा तुल्या-द्वचनादुभयोरसौ ॥ जुहूमाश्रित्य पर्णत्वविधिः प्रकृतिमात्रगः ॥ चोदकेनोभय-प्राप्तेर्विकृतौ विधिनात्र किं ॥ अनारभ्य श्रूयते । यस्य पर्णमयी जुहूर्भवति न पाप श्लोक शृणोतीति । तत्राव्यभिचरितक्रतुसंबंधवर्ती जुहूमाश्रित्य तद्धेतुः पर्णवृक्षो वाक्येन विधीयते । या जुहूः सा पर्णमयीति । वाक्यं च प्रकृतिविकृत्योस्तुल्यमेव प्रवर्तते । उभयत्राश्रयभूताया जुह्वाः सत्वात् । तस्मात् प्रकृतिविकृत्योरुभयोरप्ययं विधिरिति प्राप्ते ब्रूमः । किमयं विधिर्विकृतौ चोदकात् पूर्वं निविशते पश्चाद्वा । नाद्यः । आश्रयभूताया जुह्वाश्चोदकमंतरेणासभ-वात् । द्वितीये तु पर्णत्वमपि जुह्वा सहैव चोदकेनातिदिश्यते । तत्र पुनर्वि-धिवैयर्थ्यादयं विधिः प्रकृतिमात्रगः । एवं यस्य खादिरः स्रुवो भवतीत्युदाह-रणीयं ॥ ननु का प्रकृतिः का विकृतिरिति चेद् उच्यते । यत्र कर्तव्यं सर्वं प्रकर्षेण कर्मांतरनैरपेक्ष्येणोपदिश्यते सा प्रकृतिः । यत्र विशेषरूपमेव कर्तव्यं श्रुत्योपदिश्यते इतरत्सर्वं कर्मांतरादतिदिश्यते सा विकृतिः । स चातिदेशः प्रत्यक्षश्रुतिवचनाद्वा साम्याद्वा लिंगाद्वाऽवगंतव्य इति माधवः ॥ इदं सर्वमस्मिन् पादेऽनुसंधेयं ॥

# अथ तृतीयाऽध्यायस्य षष्ठः पादः ॥

## अथ स्रुषादिषु खादिरतादिविधेः प्रकृतिगामिता-ऽधिकरणम् ॥

### तत् सर्वार्थमप्रकरणात् ॥ १ ॥ (पू०) ॥

**भावार्थः** । किं चित् प्रकरणमुद्दिश्य यदुच्यते तत् तत्प्रकरणमवलंबते । प्रकरणं विना यत् किं चिदुक्तं तस्य साधारणत्वात् सर्वत्र निवेशः । तस्मादनुसंधास्यमानानां वाक्यानां प्रकृतौ विकृतौ च निवेशः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यस्यं खादिरः स्रुवो भवति छंदसामेव रसेनावद्यति सरसा अस्याहुतयो भवंति + + + यस्यं पर्णमयी जुहूर्भवति न पाप१ श्लोकं१ शृणोति । तै० सं० (३.५,७,१.) ॥

### प्रकृतौ वाऽद्विरुक्तत्वात् ॥ २ ॥ (सि०) ॥

**भावार्थः** । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन्न । अनुसंहितवाक्यानि प्रकृतौ निविशंते न तु विकृतौ । किं कारणं । यदि प्रकृतौ विकृतौ च तानि निविशेरन् तर्हि द्विरुक्तत्वं प्राप्नुयात् । कथं । प्रकृतौ प्रतिपदोक्तवेदवचनेन निवेशः । प्रकृतिवद्विकृतिः कर्तव्येति शास्त्रेण विकृतौ निवेशश्च । यदि प्रत्यक्षमनुसंहितवाक्यस्य विकृतौ निवेशः । यदि पुनश्च प्रकृतिवत् विकृतिः कर्तव्येति शास्त्रेण निवेशः तर्हि द्विरुक्तत्वं स्पष्टं । द्विरुक्तत्वं तु दोषः । तस्माददोषाय प्रकृतावेवाऽनुसंहितवाक्यानां निवेशः ॥

# तिसऱ्या अध्यायाचा सहावा पाद.

# THE SIXTH CHAPTER OF THE THIRD BOOK.

## आतां स्रुवादि पात्रें खदिराचीं करावींत ह्या विधीचा प्रकृतीशीं संबंध आहे हा विचार.

THE SUBJECT—THAT THE VEDIC TEXT ENJOINING THAT LADLES AND OTHER SACRIFICIAL UTENSILS ARE TO BE MADE OF THE WOOD OF ACACIA CATECHU—IS CONNECTED WITH A MODEL SACRIFICE (PRAKRITI.)

१. (कोणत्या) प्रकरणाशीं संबंध नसल्यामुळें (कोणताहि विधि) सर्वत्र लागू पडतो. (पू०)

२. तसें नव्हे; प्रकृतिरूप यज्ञाशीं (त्या पात्राचा संबंध आहे;) कारण द्विरुक्तरूप दोष येत नाहीं. (सि०)

1. A Vedic injunction, having no context, applies to all cases. (Opponent's statement.)

2. Not so; these utensils are connected with a model sacrifice, because there is no repetition. (Final statement.)

---

१. ग्रंथामध्यें प्रकरणें असतात. ज्या ज्या प्रकरणांत जो जो विषय येतो त्या त्या प्रकरणाच्या अनुरोधानें त्या त्या विषयाचें निरूपण होतें. परंतु ज्या विषयाचा कोणत्याहि प्रकरणाशीं संबंध नसतो, त्याचा अमुकच यज्ञाशीं संबंध आहे, असें म्हणतां येत नाहीं. तो विषय सर्वसाधारण. कोणत्या पाहिजे त्या यज्ञाशीं त्याचा संबंध आहे. अशा प्रकारचे मंत्र पाहिजे तर प्रकृतींत योजावेत, पाहिजे तर विकृतींत योजावेत. स्रुव म्हणून एकं पळीसारखें यज्ञपात्र आहे.

1. Every treatise divides the subject it treats of and enters on the discussion of the different divisions. Each division has thus a context of its own—a context which affects materially the interpretation of a particular text. But when a sacrificial text or the description of a sacrifice is not connected with any context, it is a mere common general statement; it may be connected with any sacrifice or with any other text. Such common texts may equally apply to a model sacrifice (Prakriti) or to a modified sacrifice. A ladle called Sruva and other

**१४. तो परमेश्वर, कारण अमक्या स्थळीं अमक्या स्थळीं तो आहे, असें उपनिषदांत वर्णन आहे.**

**14. And (He is the Supreme Spirit,) because a place and other circumstances are mentioned.**

आणि त्यांच्या अर्थाची उपपत्ति नीट करितां येते. केवळ प्रतिबिंबपुरुष असें म्हणतां येत नाहीं. आणि अशी उपपत्ति करतांना विरोध येत नाहीं म्हणून त्या वाक्यामध्यें ब्रम्हाचें निरूपण आहे असें वल्लभाचें म्हणणें आहे.

१४. या सूत्राच्या संबंधानें पुढील उपनिषद्वाक्य घेतलें आहे. " जो पृथ्वीमध्यें आहे, पृथ्वीच्या आंत असून ज्याला पृथ्वी जाणत नाहीं; ज्याचें शरीर पृथ्वी, आणि आंत असून जो पृथ्वीचा नियंता; तो तुझा अंतर्यामी आत्मा अमर. " या उपनिषद्वाक्यास घेऊन शंकराचार्य ह्मणतात कीं 'पृथ्वीमध्यें आत्मा आहे' अशा प्रकारचें वर्णन परमात्म्याचेंच असें सिद्ध होतें. परमात्म्याचे अमुक स्थान असें म्हणणें उचित नाहीं खरें. कारण परमात्मा सर्व व्यापी आहे. तसेंच परमात्म्याचें अमुक रूप आणि अमुक नाम असें म्हणणेंहि उचित नाहीं. परब्रह्म जरी निर्गुण आहे, तरी उपासनेच्या वेळीं तें सगुण आहे असें समजलेंच पाहिजे. त्याला नामरूप आहे आणि तें सगुण आहे असें ह्मटल्यावांचून उपासना करतांच येत नाहीं. रामानुजानीं अशा प्रकारच्या उपनिषद्वाक्यांची निराळ्याच रीती-

14. The following is the translation of the Upanisad-text quoted in connection with this sûtra. " Who is in the earth; being in the earth whom the earth knows not; whose body is the earth; and being inside who controls the earth; he is your inner power (antaryâmi) the immortal soul." Shankarâchârya takes this Upanisad-text and makes the following remarks that he, who is described as in the earth, is indeed proved to be the Supreme Spirit. It is not proper to speak of the Supreme Spirit as dwelling in a particular place, because it is omnipresent. It is also not proper to speak of the Supreme Spirit as having a name or form. Though the Supreme Spirit is without any quality (Nir-guna), yet it is necessary to know him as possessed of qualities when you worship him; because no worship is possible without conceiving some qualities or rather attributes. Râmânuja adjusts the interpretation of the Upanisad-text in a different way. It is right, he says, to say that God abides in a particular place, and that he has a name, because his presence can be realized and because the yogis see him. Vallabha thinks that such Upanisad-texts do not come in the way of his doctrines.

सूत्राणि.

**सुखविशिष्टाऽभिधानादेव च ॥ १५ ॥**

**भावार्थः** । सुखविशेषस्य निरूपणं कृतं तेन ब्रह्मैव निर्दिश्यते ॥ तत्र. शंकरः इतरेतरविशेषितौ तु कंखंशब्दौ सुखात्मकं ब्रह्म गमयत इति ब्रवीति । रामाऽनुजस्तु अतः कं ब्रह्म खं ब्रह्मेत्यत्रापरिछिन्नसुखं ब्रह्म प्रतिपादितमिति परं ब्रह्मैव तत्र प्रकृतं तदेव चाक्ष्याधारतयाऽभिधीयत इत्यक्ष्याधारः परमात्मेति ॥ वल्लभः अतः सुखविशिष्टाऽभिधानादेव ब्रह्मवाक्यमित्येषा मुख्योपपत्तिरित्येवकार इति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्मेति । स होवाच विजानाम्यहं यत् प्राणो ब्रह्म कं च तु खं च न विजानामीति ते होचुर्यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव कं । छां० उ० ( ४.१०,५. ) ॥ एषा सोम्य तेऽस्मद्विद्यात्मविद्या चाचार्यस्तु ते गतिं वक्ता । + + + यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यंत एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यते । + य एषोऽक्षणि पुरुषो दृश्यत एष आत्मेति होवाच । छां० उ० ( ४.१५,१. ) ॥

में व्यवस्था केली आहे. ते असें ह्मणतात—ईश्वर अमुक स्थानीं आहे आणि त्यास नांव रूप आहे; कारण ईश्वराचा साक्षात्कार होतो. आणि योग्याच्या दृष्टीस ईश्वर पडतो. वल्लभमतें अशा प्रकारच्या उपनिषद्वाक्यांची आपणास मुळींच अडचण येत नाहीं.

**१५. आणि परब्रह्मालाच सुख-विशेष आहे असें निरूपण असल्यावरून.**

१५. उपनिषद्वाक्यामध्यें लोकोत्तर सुखाचें निरूपण आहे. तेणेंकरून तें निरूपण ब्रह्माचेंच असें सिद्ध होतें. इतका सामान्य सूत्रार्थ झाला. या सूत्राचा विशेष अर्थ निरनिराळे वेदांतवादी करतात. तो नीट समजण्याकरितां उपनिषद्वाक्यांचा अर्थ मनांत आणला पाहिजे. तीं उपनिषद्वाक्यें अशीं. "प्राण ब्रह्म, सुख ब्रह्म, आकाश ब्रह्म असे." "तो बरें ह्मणाला आत्मा ब्रह्म हें मी जाणतों, सुख ब्रह्म, आकाश ब्रम्ह हें मी जाणत नाहीं. ते म्हणाले—अरे बा जें सुख तेंच आकाश, आणि जें आकाश तेंच सुख." "हें सोम्य, ही आमची विद्या (अग्नि-विद्या) तुला सांगतात; आणि ही आत्मविद्या. आणि तुझी गति काय, हें आचार्य सांगेल + + जसें कमळाच्या पानामध्यें पाणी चिकटून राहात नाहीं, तसें अशा प्रकारें जाणणाऱ्यामध्यें पाप कर्म चिकटून राहात नाहीं + + तो म्हणाला, अरे, जो पुरुष या डोळयामध्यें दिसतो तो आत्माच." हीं उपनिषद्वाक्यें घेऊन शंकराचार्य म्हणतात सुखाचेंच नुसतें वर्णन करायाचें असून उपनिषद्वाक्यामध्यें सुखवाचक दोन शब्दांचा उपयोग केला आहे. ते एकापेक्षां एक चढें सुख असें दाखवितात. म्हणजे हें आकाश मनांत येऊं नये म्हणून सुखरूप आकाश घेत-

**15. He is indeed the Supreme Spirit; because of the description of special happiness.**

---

15. The Upanisad-texts speak of an extraordinary happiness, and, therefore, they refer to the Supreme Spirit. This is the general sense of the sûtra. But its particular interpretation is different in the case of each Vedânta-school. The translation of the Upanisad-text renders it easy to understand the doctrines of the different Vedântins in connection with this sûtra. Life is the Supreme Spirit, happiness is the Supreme Spirit, space is the Supreme Spirit. He said—well, I know that the soul is the Supreme Spirit, but I do not know that happiness is the Supreme Spirit, and that space is the Supreme Spirit. They said —that happiness is space and that space is happiness." "Oh Somya, this our wisdom (the science of fire) they explain to you, and this is the science of the soul, and the Âchârya will explain to you what your condition hereafter will be. As water does not adhere to the leaf of a lotus-plant, so no sinful act can stick to him, who knows this; + + he said—well, the person seen inside the eye is indeed the Supreme Spirit. Shankarâchârya refers to these texts and states :—when only happiness is to be described, two terms which signify it, are used in the Upanisad-texts. They express transcendental happiness. To exclude the idea of the space about us, space in the form of

सूत्राणि.

श्रुतोपनिषत्कगत्यभिधानाच्च ॥ १६ ॥

**पदार्थः** । श्रुतोपनिषत्कनाम श्रुतं वेदरहस्यं येन स श्रुतोपनिषत्कः तस्य ॥

**भावार्थः** । येन वेदरहस्यं श्रुतं तस्य मृत्योरनंतरं याऽवस्था भवति साऽनुसंधास्यमानेषूपनिषद्वाक्येषु निरूपिता । तन्निरूपणात् सिध्यति तत्र ब्रह्म निर्दिष्टमिति । सर्वैर्वेदांतिभिराक्षिपुरुषः परमात्मेति स्थापितं ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययात्मानमन्विष्यादित्यमभिजयंते । एतद् वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत् परायणमेतस्माद् न पुनरावर्तंते । प्र० उ० (१.१०.) ॥ अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणं । तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः । भ० गी० (८.२४.) ॥ अथ यदु चैवास्मिन् छव्यं कुर्वंति यदि च नार्चिषमेवाभिसंभवंति + + + आदित्याच्चंद्रमसं चंद्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः ॥ ५ ॥ स एतान् ब्रह्म गमयत्येष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तंते । छा० उ० (४.१५,६.) ॥

लें, आणि त्याचा अर्थ अपरिमित असा केला. आणि हें लौकिक सुख वाचकांच्या मनांत येऊं नये, म्हणून त्यास आकाशाचें विशेषण दिलें. म्हणजे तें लोकोत्तर सुख आहे. असें जें सुख तेंच ब्रह्म, असा उपनिषद्वाक्यांचा अर्थ होतो. रामानुज या उपनिषद्वाक्याची दुसऱ्या रीतीनें व्यवस्था करतात. ते म्हणतात कीं सुख म्हणजे ब्रम्ह, आकाश म्हणजे ब्रम्ह, असें जें उपनिषदामध्यें वर्णन आहे, त्याचा अर्थ ' ज्याच्या सुखास प्रमाण नाहीं असें ब्रम्ह आहे,

happiness is mentioned. Because space is unbounded; and to exclude the idea of human happiness, it is qualified by the notion of space, that is to say, the happiness mentioned is extraordinary, and such happiness is the Supreme Spirit. Râmânuja adjusts the interpretation of the Upanisad-texts in a different way. He states that the phrases—happiness is the Supreme Spirit—as used in the Upanisads signify that the happiness of God is unbounded, and that the subject of the Upanisad-texts is the Supreme Spirit himself, and that the description

## कंठरवानें प्रतिनिधीचें वेदामध्यें निरूपण झालें असतां मुख्याचे सारे संस्कार त्यावर करायाचे, हा विचार.

## THE SUBJECT THAT ALL THE SUBSIDIARY SACRIFICIAL OPERATIONS ARE TO BE PERFORMED UPON A SUBSTITUTE, WHEN IT IS DIRECTLY AND DISTINCTLY MENTIONED IN THE VEDA.

**४०. तीं श्रुति गुणवर्णनाकरितां असून प्रतिनिधीचा नियम करते.**

**40. A direct statement of qualities determines and restricts a substitute.**

कृतिविकृतिभाव आहे, त्याची उपपत्ति आम्हीं पूर्वीं केलीच आहे.

४०. संस्कृत सूत्रामध्यें 'गुणश्रुति' आणि 'नियम' हीं पदें आलीं आहेत. त्यांचा अर्थ काय? गुणश्रुति म्हणजे अर्थवादरूपानें वर्णन. नियम म्हणजे हेच घ्यावे आणि दुसरे घेऊं नये, असा विधीचा संकोच. वेदामध्यें प्रतिनिधीचें जेव्हां प्रतिपदोक्त वर्णन झालें असतें, तेव्हां प्रतिनिधीचा नियम केला असतो. प्रतिनिधि प्रतिपदोक्त वेदामध्यें आला नसतां त्यावर जसे मुख्याचे संस्कार होतात. आणि हे संस्कार सिद्ध करण्यास जसें अनुमान साधन आहे, तसेंच प्रतिनिधीचें वेदांत प्रतिपदोक्त वर्णन झालें असतांहि संस्कार करायाचे. आणि हे संस्कारहि सिद्ध करण्यास अनुमानच साधन आहे. या सूत्रसंबंधानें जें वेदवाक्य येतें त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें. "सोमवल्ली जर न मिळेल तर पूतीकेचा रस काढावा."

latter not being distinctly and directly mentioned, is only inferred by means of the significant power of the words of a Vedic text, and the exegetical proof called *linga* applies to it. Such a distinction between what is principal and its substitute makes all the difference between the two. When what is prescribed and principal is not obtained, something is to be substituted in its place; and the two are not connected as a model and modified sacrifices are. We have already explained the relationship between Soma-drink and Phala-chamasa drink, the one is to the other as a model sacrifice is to a modified sacrifice.

40. In the original Sanskrit Sûtra the terms *gunashruti* and *niyama* are used. What does the term *gunashruti* signify? A description which directly restates qualities, and *niyama* is that which prescribes originally that such and such a substance is to be taken or such and such an act is to be performed, and that exclusively and thus narrows the application of a general original

सूत्राणि.

## दीक्षणीयादिधर्माणामग्निष्टोमांगताऽधिकरणम् ॥

**संस्थास्तु समानविधानाः प्रकरणाविशेषात् ॥ ४१ ॥ (पू०) ॥**

**भावार्थः** । ज्योतिष्टोमः प्रकृतिः । अग्निष्टोमोऽत्यग्निष्टोम उक्थ्यः षोडश्यतिरात्रोऽप्तोर्यामो वाजपेयश्चेति सप्त संस्थास्तस्य विकाराः । यदुद्दिश्य पूर्वपक्षकारो ब्रवीति । यथा प्रकृतिस्तथा विकृतयः करणीयाः । या इष्टयः प्रकृतौ क्रियंते ताः सर्वाः सर्वसंस्थासु प्राप्नुवंति। किं कारणं । प्रकरणविशेषे तासां निरूपणं नास्ति ॥

**व्यपदेशश्च तुल्यवत् ॥ ४२ ॥ (यु० ) ॥**

**भावार्थः** । सर्वासु संस्थासु समानधर्माः प्राप्नुवंति । तत्र का युक्तिरिति पृष्टः पूर्वपक्षकारो ब्रवीति । वेदे यथा प्रकृतेर्व्यवहारस्तथा विकृतीनां । पुनः प्रकृतेरारभ्य विकृतीनां क्रमेण वेदे निरूपणं कृतं । तेन समानविधानं ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यदि अग्निष्टोमो जुहोति । यदि उक्थ्यः परिधिमनक्ति । यदि अतिरात्रः एतदेव यजुर्जपन् हविर्धानं प्रतिपद्येत ॥ आग्नेयमजमग्निष्टोमे आलभेत । ऐंद्राग्नं द्वितीयं उक्थ्ये । ऐंद्रं वृष्णिं तृतीयं षोडशिनि ॥

statement. When a substitute is directly and distinctly mentioned in the Veda, then it is a case of *niyama*. But when it is not distinctly and directly mentioned in the Veda, all the subsidiary operations performed upon a principal are performed upon its substitute, and the exegetical method known as an inferential statement is employed. In like manner when a substitute is directly mentioned in the Veda, the same subsidiary

## दीक्षणीयादि इष्ट्या अग्निष्टोमाचीं अंगें आहेत, हा विचार.

**४१. विशेष प्रकरणामध्यें निरूपण नाहीं म्हणून (साऱ्या) संस्थांचेंहि सारखें विधान आहे. (पू०).**

**४२. पुनः सारखा व्यवहार आहे. (यु०).**

## THE SUBJECT THAT SUCH SACRIFICES AS DÎKSAnÎYÂ AND OTHERS ARE CONSTITUENTS OF AN AGNIStOMA-SACRIFICE.

41. A statement not connected with a particular context applies equally to all big sacrifices called Sansthâs. (Opponent's statement.)

42. Again a similar designation is given. (Argument in support of the opponent's statement.)

---

४१. ज्योतिष्टोम ही मुख्य प्रकृति. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, अप्तोर्याम आणि वाजपेय, ह्या सात संस्था. त्या प्रकृतीचे विकार आहेत. म्हणून ज्योतिष्टोमामध्यें आणि या सात संस्थेमध्यें प्रकृतिविकृतिभाव आहे. अशी व्यवस्था वैदिकाचार्य करतात. ह्या व्यवस्थेस उद्देशून, बौद्धाचार्य म्हणतातः—वैदिकाचार्य, तुम्ही प्रकृति आणि विकृति यांमध्यें जो भेद करतां तो सप्रमाण नाहीं. कारण जसें प्रकृतीचें वर्णन वेदांत आहे, तसें विकृतीचेंहि आहे. म्हणून दोहींचीहि योग्यता सारखीच. यास्तव ज्या इष्ट्या प्रकृतीमध्यें करावयाच्या त्याच साऱ्या संस्थांमध्यें कराव्या. कारण प्रकृतीचें अमकें प्रकरण आणि संस्थांचें अमकें प्रकरण असा भेद वेदांत केला नाहीं.

४२. साऱ्या संस्थांमध्यें साऱ्या इष्ट्या

operations are performed, and the same method of exegetical proof is adopted. The following is the translation of the Vedic text quoted in connection with this sûtra. "When he does not obtain a Soma-plant, he may extract the juice of a Pûtikâ plant."

41. Jyotistoma is a big model sacrifice. Agnistoma, Atyagnistoma, Ukthya, Sodashi, Atirâtra, Aptoryâma and Vâjapeya. These are the seven big sacrifices or Sansthâs. They are modifications of the Jyotistoma, the model sacrifice. The relationship between these seven sacrifices and the Jyotistoma is that between a model and a modified sacrifices. Such is the adjustment the Vaidikâchârya makes. Against this the Bouddhâchârya observes:— Vaidikâchârya, the distinction you make between a model and a modified sacrifice is not well-founded; because a model sacrifice is described in the same way as mo-

## सूत्राणि.

**विकारास्तु कामसंयोगे नित्यस्य समत्वात् ॥ ४३ ॥ (सि०)॥**

**भावार्थः।** सप्तसंस्थाश्च ज्योतिष्टोमश्च न सर्वाः प्रकृतयः। ज्योतिष्टोमः प्रकृतिः। अन्याः संस्थास्तस्य विकृतयः। किं कारणं। नित्यस्य ज्योतिष्टोमस्य कामसंयोगो नास्ति। विकृतिरूपाणां संस्थानां कामसंयोगस्य विद्यमानत्वात् तासां समत्वं। एवं ज्योतिष्टोमस्यान्यासां संस्थानां च मध्ये विवेकः कर्तुं युज्यते। भिद्यंते विकृतिरूपाः संस्थाः प्रकृतिरूपाज्ज्योतिष्टोमात् कामसंयोगेन। तस्माद् ज्योतिष्टोमे इष्टिरूपा धर्मा निरूपिताः। चोदकवाक्येन तेषां विकृतिषु योजनं च। विकृतयः कामसाधनानि। प्रकृतिस्तु साध्यं। प्रकृतिमुद्दिश्य धर्मनिरूपणं सम्यग् व्यवतिष्ठते ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

पशुकाम उक्थ्यं गृह्णीयात्। षोडशिना वीर्यकामः स्तुवीत। अतिरात्रेण प्रजाकामं याजयेत् ॥

करायाच्या. याविषयी काय प्रमाण, असें बौद्धाचार्यास विचारल्यावर ते म्हणतातः— जसा प्रकृतीविषयीं व्यवहार आहे तसाच विकृतीविषयीं व्यवहार आहे. वेदानें त्याचें निरूपण करतांना कांहीं तारतम्य दाखविलें नाहीं. प्रकृतीस प्रारंभ होऊन क्रमानें संस्थांचेंहि वेदांत निरूपण झालें आहे. म्हणून दोहोंची योग्यता सारखी असें आमचें म्हणणें आहे. या संबंधानें जीं वेदवाक्यें आलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें. " जर अग्निष्टोम हवन करतो, जर उक्थ्य, अग्निकुंडाभोंवती ठेविलेल्या परिधि नांवाच्या तीन समिधांस तूप लावतो, जर याच

dified sacrifices. Therefore, both are equally important. Therefore, all the small sacrifices or *istis*, performed in connection with a model sacrifice, ought to be performed in the case of the seven modified sacrifices; because the context of a model sacrifice is not marked in the Veda as distinct from that of a modified sacrifice.

42. When asked, why the small sacrifices or *istis* ought to be performed in a big sacrifice, the Bouddhâchârya replies:—"as a model sacrifice is designated and described in the Veda, so also a modified sacrifice is. The Veda makes no distinction between the two. The Veda begins

**४३. तसें नव्हे; कांहीं तरी साधायाचें असतां सारखेपणा असतो. म्हणून नित्याचे (ज्योतिष्टोमाचे) विकार (संस्था) आहेत. (सि०).**

**43. Not so; a similarity exists when some desire is to be accomplished. The seven sacrifices are, therefore, the modifications of the Jyotis*t*oma, the permanent or model sacrifice.**

यजुर्मंत्राचा जप करून अतिरात्र, सोमवल्ली आणण्याचा गाडा प्राप्त करून घेईल." "अग्नीस अर्पण करण्याचा मेंढा अग्निष्टोम यज्ञामध्यें मारावा, इंद्र आणि अग्नि या देवतेस अर्पण करण्याचा दुसरा उक्थ्य यज्ञांत (मारावा.) इंद्रास अर्पण करण्याचा तिसरा तरुण मेंढा षोडशि यज्ञांत (मारावा.)" "भट्टकुमारिल सूत्रांतील तुल्यवत् पदाचा क्रियेशीं अन्वय लावून सूत्रार्थ करतात म्हणून तुल्यवत् या नपुंसक रूपाचा उपपत्ति होते."

४३. वैदिकाचार्य म्हणतातः—सात संस्था आणि ज्योतिष्टोम ह्या साऱ्या प्रकृति नव्हेत. नुसती ज्योतिष्टोम प्रकृति; आणि सातहि संस्था यांच्या विकृति. असा भेद कां करावा, असें बौद्धाचार्य तुम्ही विचाराल. याविषयीं आमचें काय म्हणणें आहे तें ऐका. ज्योतिष्टोम हा नित्य यज्ञ आहे, म्हणजे नैमित्तिक नव्हे. प्रत्येक आर्य म्हटला म्हणजे त्यानें जन्मांत ज्योतिष्टोम यज्ञ केलाच पाहिजे. अमुक एक इच्छा पूर्ण व्हावी असा ज्योतिष्टोम करण्याचा हेतु नाहीं. ज्याला स्वर्गसुखाची इच्छा असेल त्यानें ज्योतिष्टोम करावा. इतकाच ज्योतिष्टोम करण्याचा काय तो उद्देश. पुढें पहा. जितक्या म्ह-

with a model sacrifice and describes all the seven sacrifices in a regular order. I, therefore, state, that a big model sacrifice and its modifications are equally important." The following is the translation of the Vedic texts quoted in connection with this sûtra. "If an Agnis*t*oma-sacrifice be performed, if in an Ukthya-sacrifice, he anoints with clarified butter, the three *Samidhâs* which surround a fire-place; if repeating mentally verses of the Yajur-Veda; if in an Atirâtra sacrifice he obtains the cart in which a Soma plant is brought." "In an Agnis*t*oma-sacrifice, he is to kill a ram to be offered to the god Agni: in an Ukthya-sacrifice another ram is to be offered to the gods Indra and Agni: in a *S*o*d*a-shi-sacrifice, another young ram is to be offered to the god Indra." Kumârila-Bha*tt*a connects the term *tulyavat* used in the Sanskrit Sûtra with a verb, and interpreting the Sûtra, as Shabaraswâmi does, explains its neuter form.

43. The Vaidikâchârya observes:—it need not be stated that the seven sacrifices and the Jyotis*t*oma are not all model sacrifices. Only the Jyotis*t*oma-sacrifice is a model sacrifice, and the seven sacrifices are its modi-

## सूत्राणि.

अपि वा द्विरुक्तत्वात् प्रकृतेर्भविष्यंतीति ॥ ४४ ॥ ( यु० ) ॥

भावार्थः । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । प्रकृतेरग्निष्टोमसंस्थस्य ज्योतिष्टोमस्य दीक्षणीयादिधर्मा भविष्यंति । द्विरुक्तत्वं तु न दोषः । कथं द्विरुक्तत्वं । अग्निष्टोमः कार्यद्वयं साधयति । तेन स हि नित्यः काम्यश्च । यथा नित्यस्तथा काम्यः कर्तव्यः । कुतस्तस्य द्विप्रकारता । वाक्यद्वयसामर्थ्यात् । अन्यथा द्वयोर्वेदवाक्ययोर्व्यवस्था कर्तुं न शक्येत ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

वसंते वसंते ज्योतिषा यजेत ॥ ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत ॥

णून विकृतिरूप संस्था, त्यांमध्यें कांहींएक मनुष्याची इच्छा पूर्ण व्हावी असा उद्देश असतो. म्हणून साऱ्या संस्था तितक्या सारख्या, त्यांमध्यें भेद नाहीं परंतु प्रकृतिरूप ज्योतिष्टोम आणि विकृतिरूप संस्था यांमध्यें भेद मोठा आहे. म्हणून ज्योतिष्टोमाच्या संबंधानें इष्ट्या वेदामध्यें सांगितल्या आहेत. हें विशेष विधान. या विशेष विधानाचा आणि संस्थांचा संबंध कसा घडतो, असें म्हणाल तर पहा. प्रकृतिसारख्या विकृति कराव्यात, असें चोदकवाक्य आहे याच्या योगानें इष्टींचा आणि विकृतींचा संबंध घडतो. प्रकृति ही मुख्य, नित्य आणि साध्य. विकृति म्हणजे संस्था हीं इष्टसिद्धीचीं साधनें. म्हणून प्रकृतीस उद्देशून वेदांत इष्ट्या सांगितल्या असें म्हटल्यानें सर्व वेदवाक्यांची व्यवस्था लागते. या सूत्रसंबंधानें जीं वेदवाक्यें घेतलीं आहेत त्यांचें भाषांतर पुढीलप्रमाणें. "ज्याला पशूची इच्छा

fications. Bouddhâchârya, you will ask why such a distinction should be made? Listen then to what I have to say. The Jyotis*to*ma-sacrifice is a permanent or obligatory sacrifice, and is distinguished from occasional or optional sacrifices. Every Ârya must in his life-time perform the Jyotis*to*ma-sacrifice. The Jyotis*to*ma-sacrifice is not performed for accomplishing any human desire. He, that seeks to obtain heaven, ought to perform the Jyotis*to*ma-sacrifice. This is its only purpose; while all the modifications of the Jyotis*to*ma secure some object desired. Hence they are all alike; but there is a great distinction between the Jyotis*to*ma, the model sacrifice and the seven sacrifices, its modifications. Hence also the small sacrifices or *istis*, performed in the course of any big sacrifice, are described in connection with the context of the Jyotis*to*ma. This is a particular statement, and it is connected with modified sacrifices by a text



**४४. द्विरुक्तरूप दोष येतो म्हणून प्रकृतिमध्येंच इष्ट्या येतील असें (म्हणणें योग्य) नाहीं. (यु०).**

44. (The statement–that all small sacrifices or *istis*) are to be (performed in the course) of the model sacrifice; because of their being tautology—is not (correct.) (Argument in support of the final statement.)

---

असेल त्यानें उक्थ्यं यज्ञाचा स्वीकार करावा. ज्याला वीर्याची इच्छा असेल त्यानें षोडशि यज्ञाच्या योगानें स्तवन करावें. ज्याला संततीची इच्छा असेल त्यानें अतिरात्र नांवाचा यज्ञ करावा."

४४. अग्निष्टोम जसा करायाचा तसाच ज्योतिष्टोम करायाचा. अग्निष्टोमामध्यें ज्या इष्ट्या करायाच्या त्याच ज्योतिष्टोमामध्यें करायाच्या. मग एका यज्ञाचीं दोन नांवें कां? एक यज्ञ दोनदां कां करायाचा? एकाच यज्ञाचें वेदामध्यें दोनदां निरूपण कां? द्विरुक्तरूप दोष आला ना? या दोषाचें वारण करण्याकरितां प्रकृतीमध्यें इष्ट्या कराव्यात, विकृतीमध्यें करूं नयेत, असें बौद्धाचार्यांचें म्हणणें पडलें. त्यास उद्देशून वैदिकाचार्य म्हणतात:—बौद्धाचार्य, तुमचें म्हणणें योग्य नाहीं. दोनदां वर्णन आलें आहे हा दोष नाहीं. दोनदां वर्णन या स्थळीं आलेंच पाहिजे. कां तें पहा, अग्निष्टोमापासून दोन कार्यें निरनिराळीं होतात. स्वर्गाची इच्छा केली कीं, अग्निष्टोम आणि ज्योतिष्टोम एकच. हा यज्ञ नित्य आहे. ही प्रकृति. कांहीं ऐहिक इच्छा केली कीं, अग्निष्टोम यज्ञ करायाचा. ही विकृति कामनासिद्धि हिचें

which is this—the modified sacrifices are performed in the same way as a model sacrifice. This text is called *chodaka*. Its function is to connect general and particular statements. It connects small sacrifices or *istis* with modified sacrifices. But the model sacrifice is principal, inevitable or permanent and an end in itself. Modified sacrifices, on the contrary, are only means to an end—the accomplishment of human desires. Hence my statement, that the small sacrifices are described along with the model sacrifice, adjusts the interpretation of all Vedic texts connected with the Jyotis*t*oma and its modifications. The following is the translation of the Vedic texts quoted in connection with this sûtra. He, who seeks cattle, ought to perform (take) the Ukthya-sacrifice." "He, who desires valour, ought to praise by means of a *S*od*a*shi-sacrifice." "He, who desires progeny, ought to cause the Atirâtra-sacrifice to be performed."

44. The Agnis*t*oma sacrifice is to be performed in the same way as the Jyotis*t*oma-sacrifice. The small sacrifices or *istis*, that are performed in the course of the Jyotis*t*oma-sacrifice, are to be performed in the course of the Agnis*t*oma-sacrifice. Then why

## सूत्राणि.

**वचनात् तु समुच्चयः ॥ ४५ ॥ ( आ० नि० ) ॥**

**भावार्थः** यत् पूर्वपक्षकारेणोक्तं द्वितीयतृतीयादिशब्दैः संस्थानां समानविधित्वे तासां समुच्चयः समानयोग्यता चेति तन् न । द्वितीयतृतीयादिशब्दैर्विशिष्टं विधानं । अतस्तेषां नातिभारः। व्यवस्था च कर्तुं शक्यते ॥

फळ. असे दोन प्रकार कोठून आणले, असें बौद्धाचार्य विचाराल तर पहा. वेदामध्यें दोन वाक्यें आहेत. त्या वाक्यांच्या बलावरून दोन यज्ञ करावे लागतात. अशी जर व्यवस्था केली नाहीं तर वेदवाक्यांचा अर्थ बरोबर बसत नाहीं. " स्वर्गाची इच्छा ज्याला असेल त्यानें ज्योतिष्टोम यज्ञ करावा. " या वेदवाक्यामध्यें इच्छेचें वर्णन झालें आहे. हा काम्य ज्योतिष्टोम. हा नैमित्तिक, हा पाहिजे असल्यास करावा. ही संस्था आहे. अशी एका वेदवाक्याची व्यवस्था. " वसंतवसंताच्या ठायीं ज्योतिष्टोम यज्ञ करावा. " हा यज्ञ केलाच पाहिजे, चुकायाचा नाहीं. हा नित्य; ही प्रकृति. याच्या योगानें कांहीं इच्छा साधून घ्यावयाची नाहीं, हा न केला असतां प्रत्यवाय घडतो.

has the same sacrifice two names—Agni*s*toma and Jyoti*s*toma? Why is the same sacrifice to be performed twice? Why is the same sacrifice twice described in the Veda? Is not this the case of tautology? To avoid such tautology the small sacrifices or *istis* ought to be performed in the course of the model sacrifice and not in the course of a modified sacrifice. This is the position of the Bouddhâchârya. Against this the Vaidikâchârya observes:—Bouddhâchârya, your position is not correct. Tautology is not a defect. Tautology in this case is essential. See how this is. Agni*s*toma answers two different purposes. When heaven is sought, Agni*s*toma is identical with Jyoti*s*toma, and is an essential and permanent sacrifice. It is besides a model sacrifice. Agni*s*toma is again to be performed for the accomplishment of some worldly desire. This is a modified sacrifice, the fruit of which is the accomplishment of some desire. If you ask me what the origin of this two-fold difference is, then see: there are two Vedic texts; their power establishes that two sacrifices ought to be performed. If this be not accepted, the interpretation of Vedic. texts cannot

## ४५. वेदवचन आहे ह्मणून साऱ्या यज्ञाचा समुच्चय. (आ० नि०).

## 45. Because there is a Vedic text, all sacrifices are included. (Doubt removed).

४५. बेचाळिसाव्या सूत्राखालीं घेतलेल्या वेदवाक्यांत "दुसरा," "तिसरा" अशीं पदें आहेत. म्हणून प्रकृतिरूप अग्निष्टोमामध्यें आणि विकृतिरूप अग्निष्टोमामधील पहिला, दुसरा, तिसरा अशा क्रमानें पशूंचें वर्णन झालें आहे. म्हणून त्या साऱ्या यज्ञाचा समुच्चय झाला आहे, म्हणून त्याची योग्यता सारखी आहे. असें बौद्धाचार्यानें म्हणणें पडलें. त्यास उद्देशून वैदिकाचार्य म्हणतात:— बौद्धाचार्य, तुम्ही जें म्हणतां तें अप्रशस्त आहे; कारण दुसरा तिसरा या पदांनीं विशेष विधान झालें आहे. इतकाच काय तो त्यांचा अर्थ. विशेष विधानाच्या योगानें त्या संस्था आहेत इतकें सिद्ध होतें. तुम्ही जसा करतां तसा अर्थ केल्यानें त्या पदाच्या सामर्थ्यावर मोठा बोजा ठेवलासा होतो. पण आमचा अर्थ त्या पदांवरून सहज करतां येतो, आणि वेदवाक्याची व्यवस्था नीट लागते.

be adjusted. "He, who desires heaven, ought to perform the Jyotis*t*oma-sacrifice" is a Vedic text which describes the accomplishment of a desire. This is the desire-accomplishing Jyotis*t*oma. This is occasional. It may be performed, if the fulfillment of the desire be sought. It is a modified sacrifice. This is the interpretation of one Vedic text. "In spring, in spring, the Jyotis*t*oma sacrifice ought to be performed." This sacrifice cannot but be performed once in the life-time of an Ârya. It is permanent, it is a model sacrifice. It accomplishes no desire. Not to perform it, is a sin.

45. In the Vedic text quoted under the forty-second sutra, the terms *second* and *third* are used. Hence in connection with the Jyotis*t*oma, the model sacrifice, and Agnis*t*oma, one of its modifications, the first, second and third sacrificial animals are described in order. Hence all the sacrifices are collectively described. Hence they are equally important. This is the position of the Bouddhâchârya. Against this the Vaidikâchârya observes:— Bouddhâchârya, your position is not correct; because the terms *second* and *third* make particular original statements. This is all the purpose they serve. By means of a particular original statement it is shown that they are modified sacrifices. Your way of inter-

सूत्राणि.

**प्रतिषेधाच्च पूर्वलिंगानां ॥ ४६ ॥ ( यु० ) ॥**

**भावार्थः** । पूर्वविधीनां प्रतिषेधात् तेषां न बाधः । किं तर्हि । विशिष्टविधयः प्रकृतिविकारभावं प्राप्नुवंति । तत्रानुसंधास्यमानवाक्यं ज्ञापकं । तथा हि भट्टकुमारिलः । क्रतुकरणेषु चोत्तरविधौ यत् पूर्वभावमनुवदति स विकारपक्षेऽवकल्पते । चोदकप्राप्तस्योत्तरेण पूर्वस्य बाधितत्वादिति ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यदि अग्निष्टोमो जुहोति । यदि उक्थ्यः परिधिमनक्ति न जुहोति ॥

---

pretation strains the significant power of the terms, while my way adjusts the interpretation of the Vedic texts, and the terms easily bear the sense.

**४६. पूर्वीच्या वचनांचा प्रतिषेध आहे म्हणून प्रकृतिविकृतिभाव आहे. ( सू० ).**

४६. प्राप्तिवांचून प्रतिषेध होत नाहीं. आणि जेथें जेथें वेदवचनांत प्रतिषेधाचें निरूपण केलें असतें, तेथें तेथें ज्याचा प्रतिषेध केला आहे त्याची प्राप्ति आहे, बाध नाहीं असें अनुमान निघतें. असा शास्त्रार्थ मनांत आणून वैदिकाचार्य म्हणतातः—बौद्धाचार्य, मुख्य आणि नित्य अग्निष्टोम आणि संस्था यांच्यामध्यें परस्पर प्रकृतिविकृतिभाव आहे, कारण पुढील वेदवाक्यामध्यें पहिले वचनांत फिरवाफिरव करणारें दुसरें वचन आहे, आणि त्यांत पहिल्याचा प्रतिषेध केला आहे, म्हणून पहिल्या वचनामध्यें प्रकृतीचें निरूपण आहे असें अनुमान निघतें. यावर भट्टकुमारिल म्हणतातः— पुढल्या वचनामध्यें पूर्वीचें करूं नये असा जो अनुवाद असतो त्या अनुवादाची. व्यवस्था प्रकृतिविकृतिभाव मानल्यानें होते. नाहीं तर चोदकवाक्यानें जें प्राप्त झालें आहे, त्याच्या योगानें पूर्वीच्याचा पूर्ण बाध होईल. या संबंधानें जें वेदवाक्य आलें आहे, त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें:— " जर अग्निष्टोम हवन करतो, जर उक्थ्य, परिधि नांवाच्या तीन समिधांस तूप लावतो, हवन करीत नाहीं." ' हवन करीत नाहीं ' हा प्रतिषेध आहे.

**46. The two sacrifices bear the relation of the model and a modified sacrifice, because of the preceding inferential Vedic texts being set aside. ( Argument in support of the final statement. )**

46. No text can be set aside when it does not accrue; and whenever the Veda prescribes that a text must be set aside, some room must be found for it: it cannot be totally set aside. This is the inference. Bearing this exegetical doctrine in mind the Vaidikâchârya observes:—the permanent and inevitable Agni*s*t*o*ma is connected with an occasional Agni*s*t*o*ma as the model sacrifice is connected with its modifications. In the following Vedic text there are two sentences, the first altering the sense of the second. The first sentence is set aside, and it, therefore, prescribes a model sacrifice as I infer. Bha*t*-*t*a Kumârila observes:— What is stated in the first sentence is set aside by the following sentence, and in doing so it reproduces the first sentence; and this reproduction is adjusted by admitting that relation which the model sacrifice bears to a modified sacrifice. Otherwise that, which a connecting text prescribes, would totally set aside what the first sentence prescribes. The following is the translation of the Vedic texts quoted in connection with this sûtra. If an Agni*s*t*o*ma-sacrifice be performed, if in an Ukthya sacrifice, he anoints with clarified butter, he

सूत्राणि.

**गुणविशेषादेकस्य व्यपदेशः ॥ ४७ ॥ ( आ० नि० ) ॥**

**भावार्थः** । द्विचत्वारिंशसूत्रे यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । एकस्य च गुणैर्भिन्नत्वेन कीर्तनादनुवादो भवति भिन्नव्यवहारश्च । परं तु तत्र वास्तविको भेदो नास्ति । अस्याधिकरणस्य यो निष्कर्षो भाट्टदीपिकायां कृतः स हि । ज्योतिष्टोमे चतस्रः संस्थाः । अग्निष्टोमोक्थ्यषोडश्यतिरात्रसंज्ञाः । संस्था नाम क्रतुप्रयोगवृत्तिस्तोत्रोपरमः । तत्र द्वादश स्तोत्राण्यग्निष्टोमे । तत्राग्निष्टोमस्तोत्रमंत्यं । साऽग्निष्टोमसंस्था नित्या काम्या च संयोगपृथक्त्वाद् दध्यादिवत् । उक्थ्ये अग्निष्टोमस्तोत्रोत्तरं त्रीण्यन्यानि सा उक्थ्यसंस्था । षोडशिनि तदुत्तरं षोडशिस्तोत्रं सा षोडशिसंस्था । अतिरात्रे तदुत्तरं द्वादशस्तोत्रात्मकास्त्रयो रात्रिपर्याया आश्विनस्तोत्रं च साऽतिरात्रसंस्था । यास्त्वत्य-ग्निष्टोमवाजपेयाप्तोर्यामाख्या अन्यास्तिस्रः स्मृतौ गण्यंते ता एतास्वेवांतर्भूताः । यत्राग्निष्टोमस्तोत्रोत्तरमुक्थान्यकृत्वा षोडशिस्तोत्रं क्रियते साऽग्निष्टोमसंस्थैवात्यग्निष्टोमपदवाच्या । यथाऽवस्थितषोडश्युत्तरं यत्र वाजपेयस्तोत्रं क्रियते सा षोडशिसंस्थैव वाजपेयपदवाच्या । यत्राऽतिरात्रे चतुर्थो रात्रिपर्यायः स्तोत्रत्रयात्मको वर्द्धते तत्रातिरात्रसंस्थैवाप्तोर्यामपदवाच्या । तत्रात्यग्निष्टोमो राजन्यस्य नित्यः अत्यग्निष्टोमे राजन्यस्य गृह्णीयादिति वचनात् । अन्यास्तूक्थ्यादयः काम्याः । पशुकाम उक्थं गृह्णीयात् षोडशिना वीर्यकामः स्तुवीतातिरात्रेण प्रजाकामं याजयेदिति वचनेभ्यः ॥ अत्राग्निष्टोमादि-शब्दानां प्रचुरप्रयोगात् संस्थास्वेव शक्तिः । तद्वति ज्योति-

ष्टोमे निरूढलक्षणा । तद्वति क्रत्वंतरे सांप्रतिकी ग्रहणे स्तोत्रे च गौणीत्येवं कौस्तुभे द्रष्टव्यमिति ॥

इति तृतीयाध्यायस्य षष्ठः पादः समाप्तः ॥

**४७. एकाच्या गुणांच्या योगानें विशेष निरूपण केलें असतें ह्मणून एकाचा व्यवहार होतो. ( आ० नि० ).**

**47. ( There is a ) designation ( of one and the same thing) because a particular description of the qualities ( of the same is given. ) (Doubt removed).**

४७. बेचाळिसाव्या सूत्रीं बौद्धाचार्यांनीं जें म्हटलें आहे, तें घेऊन वैदिकाचार्य म्हणतातः—एकाद्या व्यक्तीचे निरनिराळ्या गुणांचें वर्णन केलें असलें म्हणजे त्याचे तितके निरनिराळे प्रकार होतात. परंतु ती मुख्य व्यक्ति टाकलेशी होत नाहीं. तिचें फक्त पुनः वर्णन होतें म्हणजे अनुवाद होतो. वास्तविक त्या व्यक्तीमध्यें आणि प्रकारामध्यें भेद नाहीं. असें हें प्रकृतिविकृतिभावाचें स्वरूप आहे. भाट्टदीपिकेमध्यें या अधिकरणाचें एकंदर तात्पर्य वर्णिलें आहे. तें असें:— संस्था म्हणून चारच आहेत, सात नाहींत. अग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, आणि अतिरात्र. हे सारे ज्योतिष्टोमाचे विकार. संस्था म्हणजे काय? यज्ञ करितांना कांहीं स्तोत्रें म्हणत असतात. त्या स्तोत्रांवर मांडणी ठेवून स्तोत्र संपलें कीं संस्था पुरी झाली. संस्कृतामध्यें संस्था शब्दाचा अर्थहि असाच आहे— जेथें थांबतात तें स्थल. अग्निष्टोम यज्ञामध्यें बारा स्तोत्रें येतात. त्यांत बारावें आणि सरते शेवटच्याचें नांव अग्निष्टोम. या यज्ञाचें नांव अग्निष्टोम

does not sacrifice." 'He does not sacrifice' is the negation. It is set aside.

47. The Vaidikâchârya takes up the objection raised by the Bouddhâchârya in the forty-second sútra and replies to it:—when various qualities of the same individual things are described, it may be said that there are so many varieties of the same thing. But the individual same thing remains as it is, and cannot be lost sight of. It is, only re-described, and constitutes a case of *Anuvâda*. Strictly speaking, there is no difference between the individual thing and its varieties. Such is the essence of the relationship between a model sacrifice and its modifications. *Bhâttadîpikâ* makes the following remarks in this connection. There are properly speaking four modifications of the Jyoti*st*oma-sacrifice or Sansthâs and not seven—Agni*st*oma, Ukthya, *Sod*ashi and Atirâtra. These are the modifications of the Jyoti*st*oma. What is a Sansthâ? In the course of a big sacrifice some *stotras* or verses were recited, and by particular

संस्था. तो नित्य आहे आणि नैमित्तिकही आहे. यास दृष्टांत—दही घेऊन यज्ञ करावा, हा नित्य विधि. ज्याला इन्द्रियाची इच्छा असेल त्यानें दही घेऊन यज्ञ करावा. यज्ञ मिळून एकच. त्याचे प्रकार झाले दोन. एक नित्य, आणि एक नैमित्तिक. म्हणजे एक प्रकृति आणि एक विकृति. उक्थ्य संस्था ती कोणती? समळा अग्निष्टोम यज्ञ करून, अग्निष्टोम स्तोत्र म्हणून आणखी तीन स्तोत्रें म्हणायाचीं. षोडशि यज्ञ म्हणजे काय? उक्थ्य यज्ञामध्यें षोडशि नांवाचें स्तोत्र म्हटलें म्हणजे षोडशि यज्ञ झाला. अतिरात्र यज्ञ म्हणजे काय? षोडशि यज्ञ करून, बारा स्तोत्रें म्हणायाचीं तीं एका रात्रीमध्यें तीन वेळ म्हणायाचीं. आणि पुढें आश्विन नांवाचें स्तोत्र म्हणायाचें. या यज्ञाचें नांव अतिरात्र. आतां अत्यग्निष्टोम, वाजपेय, अप्तोर्याम ह्या ज्या स्मृतीमध्यें संज्ञा वर्णिल्या आहेत त्यांचा या चोहोंतच अंतर्भाव होतो. अग्निष्टोम स्तोत्र म्हणून, उक्थ्य म्हणून, षोडशि स्तोत्र म्हटलें म्हणजे जो अग्निष्टोम यज्ञ होतो, त्याचें नांव अत्यग्निष्टोम. सारा अल्प अग्निष्टोम यज्ञ करून, मग वाजपेय स्तोत्र म्हटलें म्हणजे जो षोडशी नांवाचा यज्ञ होतो, त्याचें नांव वाजपेय यज्ञ. सारा अतिरात्र यज्ञ करून तीन वेळ बारा स्तोत्रें म्हणून, चवथे वेळ तीन स्तोत्रें अधिक म्हणायाचीं. हा जो अतिरात्र नांवाच्या यज्ञाचा प्रकार त्यास अप्तोर्याम असें म्हणतात. क्षत्रियांनीं अत्यग्निष्टोम नित्य करावा असा भेद आहे. याविषयींचीं जीं वेदवाक्यें

adaptation of these *stotras*, a Sansthâ was said to be completed, when a *stotra* was completed. The Sanskrit word *Sansthâ* means the place where one stops. In the Agni*st*oma sacrifice there are twelve *stotras*. The twelfth and the last *stotra* is Agni*st*oma. Hence this sacrifice is called Agni*st*oma. It is both indispensable and optional. The following is the illustration of this. "By means of curds a sacrifice is to be performed." Such a text prescribes the indispensable sacrifice. "He, that desires strong sensuous powers, ought to perform a sacrifice by means of curds." This text prescribes an optional sacrifice. Properly speaking the sacrifice is one and the same; though its varieties are two—the one being indispensable and the other optional. The first is the model sacrifice and the other, one of its modifications. What is the nature of the Ukthya-sansthâ? It consists of the whole of the Agni*st*oma sacrifice and includes three *stotras* besides the Agni*st*oma-stotra. What is the nature of the *Sod*ashi-sansthâ? The Ukthya sacrifice is performed, is concluded with the *Sod*ashi-stotra and constitutes the *Sod*ashi-sansthâ. What is the nature of the Atirâtra-sansthâ? The *Sod*ashi-sacrifice being performed, twelve stotras are recited thrice during one night, and a stotra of the name Âshvina is recited last. Such is the Atirâtra-sansthâ. Atyagni*st*oma, Vâjapeya and Aptoryâma are such Sansthâs as may be included in the above four, though they are separately

आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें:—"अत्यग्निष्टोम यज्ञ क्षत्रियाचा समजावा." पुनः ज्या उक्थ्य आणि दुसऱ्या संस्था त्या नैमित्तिक आहेत. याविषयींचीं वेदवाक्यें अशीं:—"ज्याला पशूची इच्छा असेल त्यानें उक्थ्य यज्ञ करावा." "ज्याला वीर्याची इच्छा असेल त्यानें षोडशि यज्ञ करावा." "ज्याला संततीची इच्छा असेल त्यानें अतिरात्र यज्ञ करावा." यावरून मूळ संस्था ह्मणून चारच, असें भाट्टदीपिकेंत वर्णिलें आहे.

described in Smriti-works. The Agnistoma-stotra and the Ukthya-stotra and the *Sod*ashi-stotra being recited, the Agnistoma-sacrifice performed is the Atyagnistoma-sacrifice. When the whole Atyagnistoma sacrifice is performed and the Vâjapeya-stotra is recited, the *Sod*ashi-sacrifice thus performed constitutes the Vâjapeya sacrifice. The whole Atirâtra-sacrifice is performed, the set of twelve *stotras* is thrice recited, and in addition, three *stotras* are recited at the fourth time. Such an Atirâtra-sacrifice is called Aptoryâma-sacrifice. In the case of the Ksatriyas, the Atyagnistoma sacrifice is indispensable. The following is the translation of the Vedic texts quoted in connection with this sûtra. "The Atyagnistoma sacrifice is to be known as of the Ksatriyas." Again the Ukthya and other sansthâs are optional. The following text supports this statement. "He, that desires cattle, ought to perform the Ukthya sacrifice." "He, that desires valour, ought to perform the *So*dashi-sacrifice." He, that desires progeny, ought to perform the Atirâtra sacrifice." Thus the principal sansthâs are four.

## उपसंहार.

पूर्व मीमांसा ह्मणजे पूर्वी प्राचीन आर्यांच्या इतिहासाचें घर असें आह्मीं वारंवार सांगण्यास नको. पूर्वी जे उपसंहार लिहिले आहेत त्यावरून इतिहासाचें स्वरूप आणि त्याची योग्यता वाचकांच्या लक्षांत आली असेल. आतां असें दाखविलें पाहिजे कीं, यज्ञाची व्यवस्था पूर्व मीमांसेंत असतां त्यापासून इतिहास कसा निघतो. आह्मी पूर्वी सांगितलेंच आहे कीं कोणत्याहि देशाचा कोणताहि ऐतिहासिक वेळ घेतला, आणि त्याचा विचार केला ह्मणजे त्या देशामध्यें प्रापंचिक, राजकीय, सैनिक, कलाकौशल्यसंबंधी, काव्यसंबंधी, धर्मसंबंधी, व्यापारसंबंधी लोकांच्या मनाचे कल आणि विचाराचे अंकुर प्रथम दर्शनीं निरनिराळे दिसतात खरे. परंतु वास्तविक एकच विचार प्रबळ असून त्याच्या योगानें सर्व व्यवस्था होत असते. यास दृष्टांत. निरनिराळ्या रत्नांची माळ केली खरी. पण त्या सर्व रत्नांस एके ठिकाणीं राखणारा, ज्या दोऱ्यांत तीं ओंवलीं असतात तो दोरा, तसे लोकांचे प्रापंचिक, राजकीय, धार्मिक व्यापार भिन्न खरे, परंतु जो विचार प्रबळ असतो त्या विचाराच्या धोरणानें त्या व्यापारांची व्यवस्था होते. त्यामध्यें आवेश राहतो. सामाजिक व्यवस्था सुरळीत चालते. लोकांमध्यें एकी असते, आणि सामाजिक, प्रापंचिक, राजकीय, धार्मिक व्यवहारास एक वळण असतें.

## SUMMARY.

We have often stated that the controversies of the Pûrva Mîmânsâ-system are a store-house of the history of the ancient Âryas. Our readers may have perceived the nature of this history and its importance from the summaries which we have already written. The question now to be answerd is—when the Pûrva-Mîmânsâ-system seeks to interpret and adjust Vedic texts in relation to sacrifices, how can it supply* historical information? We have already stated that when a period of the history of a country is examined, a variety of interests apparently conflicting with one another is discovered—a variety such as social, political, military and manufacturing interests, and those of art, literature, religion, philosophy and commerce. Though the tendencies of the popular mind and the influences that determine its feelings and thoughts appear to be varied and different at first sight, yet one conceit or a sentiment predominates and controls all the institutions, and regulates all the interests of a nation. This position is thus to be illustrated. A garland may consist of different and dissimilar gems; but the garland exists so long as a chain passes through them and holds them together. So though social, political, and religious interests be different and conflicting, yet their power is maintained by some one popular conceit or sentiment, which, as it predominates at a particular time

आणि तो विचार सुटला कीं, वळणहि सुटलें. आणि लोकांमध्यें अव्यवस्था उत्पन्न झाली. यास दृष्टांत आतांची आपल्या देशाची स्थिति. सर्व व्यापारास एक वळण देणारा असा एक विचार कोणताच प्रबळ नाहीं. कोणत्याहि देशाच्या इतिहासाचा विचार करूं लागलें म्हणजे ज्या वेळेचा इतिहास घ्यायाचा त्या वेळीं कोणता विचार प्रबळ होता हें शोधून काढलें पाहिजे. प्राचीन आर्यांचा बौद्धधर्म प्रबळ होई तोंपर्यंत इतिहासाचा शोध करूं लागलें म्हणजे आर्य लोकांची यज्ञावर श्रद्धा हाच विचार प्रबळ होता असें दिसून येतें. प्रापंचिक व्यवहारामध्यें, धार्मिक व्यवहारामध्यें, राजकीय व्यवहारामध्यें किंवा सामाजिक व्यवहारामध्यें कांहीं एक गडबड झाली कीं, तिची व्यवस्था करतांना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांना यज्ञाची व्यवस्था करावी लागे. यज्ञसंबंधीं ज्या अडचणी त्या दूर न झाल्या तर त्यांना कोणतीहि व्यवस्था करतां येत नसे. म्हणून जें जें करणें तें तें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे प्रथम यज्ञास संभाळून करीत. सारे यज्ञ वेदांत सांगितल्याप्रमाणें करायाचे. आणि प्रापंचिक, राजकीय, धार्मिक आणि सामाजिक संप्रदायाचा काय जो मुख्य आधार तो वेद. तेव्हां वेदाचाच विचार मुख्य. वैदिक आणि बौद्ध परंपरेमध्यें मुख्य भेद तो हाच कीं, वैदिक परंपरेमध्यें वेद प्रमाण. बौद्ध परंपरेमध्यें बुद्धि प्रमाण. परंतु वैदिक परंपरेमध्यें वेदच प्रमाण म्हटलें म्हणजे बुद्धिवाद मुळींच करायाचा नाहीं

moulds the institutions, customs, and folklore of a nation. Under its influence society moves on; people are united; and social, individual, political, and religious interests seek to accomplish the same end, and tend towards it. As soon as the popular conceit or the ideal, a nation aspires after, is affected, the tendencies of a nation undergo a change, and symptons of disorganization manifest themselves. The present condition of our country is the best illustration in point. The truth is that the nation has no ideal before it, nor is it influenced by one strong sentiment, possessing power to mould and regulate all its institutions and customs. In analyzing the conditions in which the history of a nation originates, it is the duty of a scientific historian to discover the deep essential conceit or sentiment on which all national institutions and customs hinge—the conceit or sentiment which is the only key to the interpretation of national customs and aspirations of a particular period. In analyzing the history of the ancient Âryas before the predominance of Buddhism, the faith of the Âryas in their own system of sacrifices is the prevailing sentiment which requires to be carefully noticed. Whenever they had to organize any social, political, or religious movement, the Âryas consisting of Brâhmanas, Ksatriyas and Vaishyas had to seek a sanction from their sacrificial practices, and customs; and when they could not overcome the circumstances in which they found themselves placed, they made bold to exa-

असें नाहीं. सर्व व्यवहाराचा आधार बुद्धिवाद खरा. नाहीं तर सारे व्यवहार चालतील कसे? एकदां कानू करून ठेवले म्हणजे ते निरनिराळे मन्वंतरांत अमलांत आणतां येतात असें नाहीं. निरनिराळ्या मन्वंतरीं लोकसमाजास निरनिराळ्या अडचणी येतात. त्या दूर करून व्यवस्था केलीच पाहिजे, मग आर्यजनांच्या व्यवहारास आधार दोन प्रमाणें झालीं. एक वेद आणि दुसरें बुद्धिवाद. पण अशीं दोन प्रमाणें मानली असतां लोकसमाजाची व्यवस्था कशी होईल? आणि त्याचे सारे व्यापार सुरळित कसे चालतील? सारे व्यापार केवळ वेदासच घेऊन चालूं म्हटलें तर बुद्धिवाद एकीकडे ठेवावा लागेल. सारेच व्यापार केवळ बुद्धिवादास अनुसरून चालूं म्हटलें तर वेद एकीकडे ठेवावा लागेल. वेदासच अनुसरून चालूं म्हटलें असतां लोकसमाजांत अनवस्था प्राप्त होते. कारण नानाप्रकारचे प्रसंग मनुष्यास येतात. जसा प्रसंग येतो तसें मनुष्यास वागलेंच पाहिजे. प्रसंगापुढें मनुष्याचें कांहीं चालत नाहीं. प्रसंग आला कीं, तो चुकवावा म्हणून कांहींतरी तजवीज योजलीच पाहिजे. असे वेळोवेळीं लोकसमाजावर प्रसंग येतात. म्हणून त्यास वेळोवेळीं बुद्धिवाद करून आचरण करावें लागतें. तेव्हां वेळोवेळीं लोकसमाजाची निरनिराळी व्यवस्था होऊं लागेल. म्हणून वेदास सोडतां कामाचें नाहीं, आणि बुद्धिवादासहि सोडतां कामाचें नाहीं असें सिद्ध झालें. याचा अर्थ काय? एकंदर लोकांमध्यें प्राचीन-

mine and recast their sacrificial institutions and customs. They could not undertake any important work without first enquiring and determining how their sacrificial customs were affected. In whatever direction the Vedic society moved, it invariably attempted to conform to its sacrificial customs; and as all sacrifices were performed in conformity with the Veda, the Veda was considered to be the only source of all their institutions. They fell back upon the Veda and examined what it prescribed. The cardinal distinction between the Vedic and Buddhistic polities is this that the former zealously and scrupulously adhered to the Veda, while the latter discarded it and recognized right reason as the fountain of all they sought to do or to say. But when it is stated that the Vedic polity exclusively recognized the Veda, it is not to be understood that they totally discarded right reason, and that they condemned the spirit of rational controversy. In fact right reason is the fountain of all human actions, customs, and institutions, otherwise how can social economy be worked? Principles and rules once laid down cannot regulate human activities as circumstances change. At different times society has to meet new difficulties and to adapt itself to them. These difficulties must be overcome, and a fresh start must be made. This the ancient Âryas practically understood. They at once adhered to the Veda and followed right reason. How could these conflicting elements be made to harmonize—the immu-

काळाचे संप्रदाय जे चालत आले ते सोडतां येत नाहींत. कारण ते सोडले कीं अव्यवस्था होते. बुद्धिवादास सोडतां येत नाहीं. कारण बुद्धिवाद सोडला कीं, आलेला प्रसंग टळत नाहीं. आणि प्रसंगाच्या मारांतून तर मनुष्यास कसेंहि करून निसटलें पाहिजे. ह्मणून विचारी, चतुर, आणि बुद्धिवादांत प्रवीण असे लोक, अव्यवस्था होऊं नये ह्मणून दोहींसहि सांभाळायास पहातात. ह्मणून लोकांमध्यें जे संप्रदाय चालू आहेत, त्यांची आणि बुद्धिवादाची एकवाक्यता करतात. ह्मणजे तंटाबखेडा न होतां, अव्यवस्था न होतां, सुरळित रीतीनें सामाजिक, प्रापंचिक, धार्मिक, आणि राजकीय व्यापार, चालतात. . परंतु प्रसंगानुरूप वागण्याची आणि लोकांमधील अनंत संप्रदाय यांची एकवाक्यता कशी करायाची ? ह्मणून साऱ्या अनंत संप्रदायांची माळ एका दोऱ्यामध्यें ओंवलेली असते. तो दोरा ह्मणजे कोणी एक प्रबळ विचार. कोणी एक प्रबळ संप्रदाय. साऱ्या समाजाची कोणी एक मानसिक वृत्ति. या वृत्तीस न चिडवितां लोकसमाजाची व्यवस्था करावी लागते. आणि चुकून किंवा मुद्दाम त्या वृत्तीस धक्का लागला ह्मणजे लोकसमाज चिडून चवताळून जातो.

पंडितांचें हेंच काम आहे कीं, ती वृत्ति कोणती, हें शोधून काढायाचें. आणि त्या सांप्रदायिक वृत्तीची आणि बुद्धिवादाची एकवाक्यता करायाची. अशी एकवाक्यता करण्याचा प्रसंग प्राचीन आर्यांवर वारंवार आला. तो केव्हां के-

table Veda and the ever-changing right reason. And how could social economy be worked according to them, and how could a social organization maintain its power? The position is this—if the Veda is to be scrupulously adhered to, right reason must be set aside, and if sanction be sought from right reason, the Veda must be set aside. Again, they discovered that if they adhered to the Veda scrupulously, their society was threatened with disorganization, because it had to pass through great revolutions. Necessity and stern circumstances compel man, however he may struggle against the force, to energize in a particular direction and in a particular way. All human energies are powerless before gigantic social forces which circumstances create. When to avert the circumstances is despaired of, he quietly attempts to adapt himself to them. Such is frequently the condition of nations, and at such times nations quietly try to find out what the sanctions of right reason are. A great social upheavel takes place. Being recast from time to time society moves on. Thus the immutable Veda and right reason are two great economical forces; and it is plain that man is neither willing nor prepared to set aside either. And what is the significance of working two conflicting elements? A nation cannot ignore the customs which it has inherited; because as soon as national customs are abandoned, society is disorganized. Society cannot ignore right reason; because when it stubbornly acts in

सूत्राणि.

## चमसाध्वर्यूणां दशसंख्यानियमाऽधिकरणम् ॥

### दशत्वं लिंगदर्शनात् ॥ २७ ॥

**भावार्थः।** वेदवाक्यं वर्तते तेन दश चमसाध्वर्यवो वरीतव्या इति सिध्यति। परं तु यत्र दशानां कर्म तत्र दश। न्यूनाधिकानां नेति सिद्धांतः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

दश चमसाध्वर्यवो दश दश एकैकं चमसमनुसर्पंति। एतस्मात् कारणाद् दशपेयो भवति ॥

## शमितुरपृथक्त्वाऽधिकरणम् ॥

### शमिता च शब्दभेदात् ॥ २८. ॥ (पू०) ॥

**भावार्थः।** नामधेयभेदो वर्तते। तेन यत्र नामधेयं भिन्नं तत्रर्त्विग्भिन्न इति द्वाविंशसूत्रे सिद्धांतितं। तेनर्त्विग्भ्यो यजमानाच्चमसाध्वर्युभ्यश्च शमिता भिन्नः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

शमितारं उपयीत ॥ अर्द्धं च वैकर्तस्य क्लोमा च शमितुस्ताद् ब्राह्मणाय दद्याद् यद्यब्राह्मणः स्यात्। ऐ० ब्रा० (७. १.)॥

---

णजे अध्वर्यु, ब्रह्मा, होता आणि उद्गाता यांस साहाय्य करणारे चमसाध्वर्यु ऋत्विज. होत्रकांचें म्हणजे मैत्रावरुण, प्रस्तोता, ब्राह्मणाच्छंसी आणि अच्छावाक यांचे साहाय्य करणारे चमसाध्वर्यु."

२६. ज्या वेदवाक्यानें चमसाध्वर्यु ऋत्विजांची नेमणूक होते, त्या वेदवाक्यामध्यें चमसाध्वर्युविषयीं स्पष्ट बहुवचनाचा उपयोग केला आहे, म्हणून पुष्कळ चमसाध्वर्यु असावेत असें सिद्ध होतें.

the Chamasâdhvaryu-priests who assist the Adhvaryu, Brahmâ, Hotâ and Udgâtâ-priests; the Chamasâdhvaryu-priests, who assist the Hotrikas, that is, Maitrâvaruna, Prastotâ, Brâhmanâchchhansi and Achchhâvâka."

26. The fact—that there are many Chamasâdhvaryu-priests—is established by the use of the plural number, in the case of the Chamasâdhvaryu-priests, in the Vedic text which prescribes their nomination.

## चमसाध्वर्यु ऋत्विज दहा असावेत या नियमाचा विचार.

**२७. वेदवाक्य अढळतें म्हणून दहा.**

## *शमिता नांवाचा ऋत्विज भिन्न नाहीं हा विचार.

**२८. शमिता हें नांव मात्र भिन्न आहे, म्हणून ऋत्विज भिन्न आहे. (पू०).**

## THE SUBJECT THAT THERE ARE ONLY TEN CHAMASÂDHVARYU-PRIESTS.

**27. There are ten Chamasâdhvaryu-priests because of a significant Vedic text.**

## THE SUBJECT THAT THE PRIEST CALLED SHAMITÂ IS NOT EXCLUDED.

**28. Because the name *Shamitâ* is different; the priest-shamitâ is excluded. (Opponent's statement.)**

---

२७. वैदिकाचार्य म्हणतातः—वेदवाक्य आहे खरें. त्यामध्यें दहा चमसाध्वर्यु नेमावे असें आहे खरें. परंतु ज्या यज्ञामध्यें दहांचें कर्म त्या यज्ञामध्यें दहा नेमावेत. कमी जास्ती जसे काम पडेल त्याप्रमाणें दहा चमसाध्वर्यु नेमावे असा सिद्धांत. या संबंधानें जें वेदवाक्य आलें आहे त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें. "दहा चमसाध्वर्यु असतात. दहा दहा जण एकेका पेल्यापाशीं सरकून जातात. म्हणून त्या यागास दशपेय असें नांव पडलें आहे."

२८. जो पशुस ठार मारतो त्याचें नांव शमिता. हें काम कोणी तरी एक ऋत्विज करतो. या कामासाठीं निराळा ऋत्विज नाहीं. बाविसाव्या सूत्रांतील सिद्धांताच्या धोरणानें बौद्धाचार्य म्हणतातः—वैदिकाचार्य, नांव भिन्न आहे म्ह-

27. The Vaidikâchârya observes :—Well Bouddhâchârya, it is true that there is a Vedic text which prescribes ten as the number of Chamasâdhvaryu-priests. But the number may be reduced or enlarged in proportion to the amount of work to be done in a sacrifice. When ten priests are required, ten may be employed. The following is the translation of the Vedic texts quoted in this connection. ("There ought to be) ten (chamasâdhvaryu-priests. Ten by ten crawl to a cup of Soma called *Chamasa*; therefore, the sacrifice is called Dashapeya."

28. He, who kills a sacrificial animal, is called Shamitâ. An animal for a sacrifice is killed by any one of the ordinary priests. A separate priest is not nominated for this purpose. Referring to the proposition established in the twenty-second sûtra, the

सूत्राणि.

प्रकरणाद् वोत्पत्त्यसंयोगात् ॥ २९ ॥ ( सि० ) ॥

भावार्थः । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । य ऋत्विक् पशुशमनं करोति स शमिता । किं प्रमाणं । प्रकरणं उत्पत्तिवाक्याभावश्च ॥

## उपगस्याऽपृथक्त्वाऽधिकरणम् ॥

उपगाश्च लिंगदर्शनात् ॥ ३० ॥

भावार्थः। उपगाश्च न भिन्ना ऋत्विक्षु तेषामंतर्भावात् । शब्दस्य यौगिकत्वात् । लिंगमपि विद्यते । प्राप्तिं विना प्रतिषेधो नास्तीति न्यायेनानुसंधास्यमानवेदवाक्यं व्यवतिष्ठते ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

न अध्वर्युरुपगायेत् ॥

णून सामान्य ऋत्विजाहून आणि यजमानाहून शमिता नांवाचा ऋत्विज भिन्न असला पाहिजे. या संबंधानें वेदवाक्य आलें आहे त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें. " शमित्या, ऋत्विजाजवळ जावें मग फोफुस आणि पाठीच्या मासाचा अर्धा भाग शमित्याला द्यावा. आणि शमिता जर ब्राह्मण नसला तर तो ब्राह्मणास द्यावा."

Bouddhâchârya observes:—Vaidikâchârya, because of the name Shamitâ being distinctive, the Shamitâ-priest can be neither a sacrificer, nor an ordinary officiating priest. The following is the translation of the Vedic text quoted in this connection. "Oh Shamitâ, approach the officiating priests. Give unto Shamitâ one half of the lungs and the flesh of the back; but if he be not a Brâhmana, give these to a Brâhmana."

ब्राह्मणग्रंथ आहे, त्यामध्यें अधिदेवादिकांचें जें वर्णन आहे त्या वर्णनाच्या संबंधानें अंतर्यामी म्हणजे भगवानच समजावाचा, दुसरा कोणी नाहीं. वल्लभ म्हणतात कीं ब्रह्मांडामध्यें जें सामर्थ्य दिसून येतें तें स्वत: निरनिराळ्या वस्तूंच्या अंगीं नाहीं. तें केवळ कार्य आहे. त्याचें कारण परमात्मा. म्हणून परमात्म्याच्या अंगीं गुण आहेत. या सूत्राच्या संबंधानें जीं उपनिषद्वाक्यें येतात त्यांचा अर्थ. "जो पृथ्वीमध्यें आहे, जो पृथ्वीच्या आंत असून, ज्याला पृथ्वी जाणत नाहीं, पृथ्वी ज्याचें शरीर, पृथ्वीच्या आंत असून जो पृथ्वीचें नियमन करतो तो तुझा अमर आत्मा—अंतर्यामी. जो जलांमध्यें आहे; जो जलांच्या आंत असून ज्याला जलें जाणत नाहींत; जलें ज्याचें शरीर, जो आंत असून, जलांचें नियमन करतो, तो तुझा अमर आत्मा—अंतर्यामी. जो अग्नीमध्यें आहे; अग्नीच्या आंत असून ज्याला अग्नि जाणत नाहीं; अग्नि ज्याचें शरीर; जो आंत असून अग्नीचें नियमन करतो तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो आकाशांत आहे; जो आकाशाच्या आंत असून, आकाश ज्यास जाणत नाहीं; आकाश ज्याचें शरीर; जो आंत असून आकाशाचें नियमन करतो; तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो वायूच्या आंत आहे; वायूच्या आंत असून ज्यास वायु जाणत नाहीं; वायु ज्याचें शरीर; जो आंत असून वायूचें नियमन करतो; तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो सूर्याच्या

bha observes:—whatever power is observed in the universe, does not really belong to anything in the universe. It is merely an effect, the cause of which is the Supreme Spirit, which possesses the real powers. The following is the translation of the Upanisad-text quoted in connection with this sūtra. "Who abides in the earth; being in the earth, whom the earth knows not; whose body is the earth; being in the earth, who regulates the earth; that is thy immortal soul, the inner ruler. Who abides in waters; being in waters, whom the waters know not; whose body is waters; being in waters, who regulates waters; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in fire; being in fire, whom the fire knows not; whose body is fire; being in fire, who regulates fire; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in space; being in space, whom the space knows not; whose body is space; being in space, who regulates space; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the air; being in the air, whom the air knows not; whose body is air; being in the air, who regulates air; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the Sun; being in the Sun, whom the Sun knows not; whose body is the Sun; being in the Sun, who regulates the Sun; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the Moon and in the stars; being in the Moon and in the stars, whom the Moon and the stars know not; whose body is the Moon and the stars; being in the Moon and in the stars, who regulates the Moon and the stars;

आंत आहे; सूर्याच्या आंत असून ज्यास सूर्य जाणत नाहीं; सूर्य ज्याचें शरीर; जो आंत असून सूर्याचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो चंद्रताऱ्याच्या आंत आहे; चंद्रताऱ्यांच्या आंत असून ज्यास चंद्रतारे जाणत नाहींत; चंद्रतारे ज्याचें शरीर; जो आंत असून चंद्रताऱ्याचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो दिशांच्या आंत आहे; दिशांच्या आंत असून ज्यास दिशा जाणत नाहींत; दिशा ज्याचें शरीर; जो आंत असून दिशांचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो विद्युल्लतेच्या आंत आहे; विद्युल्लतेच्या आंत असून ज्यास विद्युल्लता जाणत नाहीं; विद्युल्लता ज्याचें शरीर; जो आंत असून विद्युल्लतेचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो मेघांच्या आंत आहे; मेघांच्या आंत असून ज्यास मेघ जाणत नाहींत; मेघ ज्याचें शरीर; जो आंत असून मेघांचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो सर्व लोकांच्या ठायीं आहे; सर्व लोकांचे ठायीं असून सर्व लोक ज्यास जाणत नाहींत; सर्व लोक ज्याचें शरीर; जो आंत असून, सर्व लोकांचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. इतकें हें लोकसंबंधानें. जो वेदामध्यें आहे; वेदाच्या आंत असून ज्यास वेद जाणत नाहींत; वेद ज्याचें शरीर; जो आंत असून वेदाचें नियमन करतो तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. इतकें हें वेदसंबंधानें. जो सर्व यज्ञांमध्यें आहे,

that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the directions; being in the directions, whom the directions know not; whose body is directions; being in the directions, who regulates directions; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the lightening; being in the lightening, whom the lightening knows not; whose body is the lightening; being in the lightening, who regulates the lightening; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in a cloud; being in a cloud, whom the cloud knows not; whose body is a cloud; being in a cloud, who regulates the cloud; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in all regions; being in all regions, whom the regions know not; whose body is all regions; being in all regions, who regulates all regions; that is thy immortal soul, the inner ruler. This much about regions. Who is in the Vedas; being in the Vedas, whom the Vedas know not; whose body is the Vedas; being in the Vedas, who regulates the Vedas; that is thy immortal soul, the inner ruler. This much about the Vedas. Who is in all sacrifices; being in all sacrifices, whom the sacrifices know not; whose body is all sacrifices; being in all sacrifices, who regulates sacrifices; that is thy immortal soul, the inner ruler. This much about sacrifices. Who is in all existences, being in all existences, whom the existences know not; whose body is all existences; being in all existences, who regulates all existences; that is thy immortal soul, the inner ruler. This much about all existences. Who is in life; being in the life,

सर्व यज्ञांमध्यें असून ज्यास सर्व यज्ञ जाणत नाहींत, सर्व यज्ञ ज्याचें शरीर, आंत असून जो सर्व यज्ञांचें नियमन करतो तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. इतकें हें यज्ञसंबंधानें. जो सर्व भूतांच्या ठायीं आहे, सर्व भूतांच्या आंत असून ज्यास सर्व भूतें जाणत नाहीत, सर्व भूतें ज्याचें शरीर, आंत असून जो सर्व भूतांचें नियमन करतो तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. इतकें हें भूतांच्या संबंधानें, जो प्राणामध्यें आहे, प्राणामध्यें असून ज्यास प्राण जाणत नाहीत, प्राण ज्याचे शरीर, आंत असून जो प्राणाचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो वाचेमध्यें आहे, वाचेमध्यें असून ज्यास वाचा जाणत नाही, वाचा ज्याचें शरीर, आंत असून जो वाचेचे नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो डोळ्यांमध्यें आहे, डोळ्यांमध्यें असून ज्यास डोळे जाणत नाहींत, डोळे ज्याचे शरीर, आत असून जो डोळ्यांचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो श्रोत्रेन्द्रियामध्यें आहे, श्रोत्रेंद्रियामध्यें असून ज्यास श्रोत्रेन्द्रिय जाणत नाही. श्रोत्रेंद्रिय ज्याचें शरीर, आंत असून जो श्रोत्रेंद्रियाचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो मनामध्यें आहे, मनामध्यें असून मन ज्यास जाणत नाहीं, मन ज्याचें शरीर, आंत असून जो मनाचें नियमन करतो; तो तुझा अमर आत्मा—अंतर्यामी. जो त्वगिंद्रियांत आहे, त्वगिंद्रियांत असून ज्यास त्वगिंद्रिय जा-

whom the life knows not; whose body is life; being in life, who regulates life; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the speech; being in the speech, whom the speech knows not; whose body is speech; being in the speech, who regulates speech; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the eyes; being in the eyes, whom the eyes know not; whose body is eyes; being in the eyes, who regulates eyes, that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the sense of hearing; being in the sense of hearing, whom the sense of hearing knows not; whose body is the sense of hearing; being in the sense of hearing, who regulates the sense of hearing; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the mind; being in the mind, whom the mind knows not; whose body is the mind; being in the mind, who regulates the mind; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the sense of touch, being in the sense of touch, whom the sense of touch knows not; whose body is the sense of touch; being in the sense of touch, who regulates the sense of touch; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the light; being in the light, whom the light knows not; whose body is light; being in light, who regulates light; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in darkness; being in the darkness, whom the darkness knows not; whose body is darkness; being in the darkness, who regulates darkness; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in semen; being in semen, whom the

सूत्राणि.

**न च स्मार्तमतद्धर्माऽभिलापात् ॥ १९ ॥**

**भावार्थः** । स्मार्तं न तु सांख्यसिद्धांताभिमतं प्रधानं । किं तर्हि ब्रह्मैव । किं कारणं । प्रधानस्य रजःसत्त्वतमोरूपत्वात् । ब्रह्म अतत् तस्य धर्माः । तस्मादतद्धर्मनिरूपणाद् ब्रह्मैव निर्दिश्यते ॥ यद्यप्यदृष्टत्वादिव्यपदेशः प्रधानस्य संभवति तथापि न द्रष्टृत्वादिव्यपदेशः संभवति प्रधानस्याऽचेतनत्वेनेति शंकरः ॥ यथा स्मार्तमचेतनं सर्वज्ञत्वसर्वनियंतृत्वसर्वात्मत्वादिकं नार्हतीति रामानुजः ॥ त्रिगुणत्वादिप्रधानधर्मानुक्तेर्न स्मृत्युक्तं प्रधानमंतर्यामीति मध्वः ॥ ननु ब्रह्मवादेऽतर्यामी न प्रसिद्धः जीवब्रह्मजडानामेव प्रसिद्धत्वात् । अतोऽतर्यामिणः सांख्यपरिकल्पितस्य गुणयोगात् तादृशस्य ब्रह्मत्वे वा कः पुरुषार्थो भवेदिति वल्लभः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अप्रतर्क्यमविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः । म० स्मृ० ( १.५.) ॥ अदृष्टो द्रष्टाऽश्रुतः श्रोता । अमतो मंताऽविज्ञातो विज्ञाता । बृ० आ० उ० ( ३.७,२३.) ॥ न दृष्टेर्द्रष्टारं पश्येः । बृ० आ० उ० ( ३.४,२.) ॥

णत नाहीं, त्वगिंद्रिय ज्याचें शरीर, आंत असून जो त्वगिंद्रियाचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो तेजाच्या आंत आहे, तेजामध्यें असून ज्यास तेज जाणत नाहीं, तेज ज्याचें शरीर, आंत असून जो तेजाचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो अंधकाराच्या आंत आहे, अंधकाराच्या आंत असून ज्यास अंध-

semen knows not; whose body is semen; being in semen, who regulates semen; that is thy immortal soul, the inner ruler. Who is in the soul, being in the soul, whom the soul knows not; whose body is soul; being in the soul, who regulates the soul; that is thy immortal soul, the inner ruler. Not being seen, He sees all things; not being heard, He hears all things; not being conceived, He conceives all things; not being

**१९. त्याचे धर्म वर्णिले असल्यामुळें, प्रधान तें ब्रह्म**

**19. Its properties being described, (the Pradhâna of the Sânkhyas or) of the Smritis is not (Brahma).**

---

कार जाणत नाहीं, अंधकार ज्याचें शरीर, आंत असून अंधकाराचे जो नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो रेताच्या ठायीं आहे, रेतामध्यें असून ज्यास रेत जाणत नाहीं, रेत ज्याचें शरीर, आंत असून जो रेताचें नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. जो आत्म्याच्या ठायीं आहे, आत्म्याच्याठायीं असून आत्मा ज्यास जाणत नाही, आत्मा ज्याचें शरीर, आंत असून आत्म्याचें जो नियमन करतो, तो अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. (कोणाला) न दिसतां सर्वांला (पहाणारा), (कोणाच्या ऐकण्यांत न येतां सर्व ऐकणारा), (कोणांच्या) मननांत न येतां सर्व मनन करणारा, (कोणास) न समजतां सर्वांस जाणणारा. त्यावांचून दुसरा पहाणारा नाहीं, त्यावांचून दुसरा ऐकणारा नाहीं, त्यावांचून दुसरा मनन करणारा नाहीं, त्यावांचून दुसरा जाणणारा नाहीं, हा अमर तुझा आत्मा—अंतर्यामी. याशिवाय दुसरे (सर्व) पीडित, पुढें कीं उद्दालक अरुणि थांबला." या वाक्यांतील 'अंतर्यामी' शब्दाच्या अर्थाचा विचार सूत्रांत झाला आहे.

१९. सूत्रामध्ये 'अतत्' आणि 'स्मार्त' असे दोन शब्द आले आहेत. भाष्यकार अतत् या शब्दाचा

known, He knows all things; none but He sees; none but He hears; none but He conceives; none but He knows; this is thy immortal soul, the inner ruler. Except Him, every thing else is distressed; well, then, Uddâlaka-Aruni ceased his discourse." The meaning of the term Antaryâmî, as used in this text, is adjusted in this sûtra.

19. The terms *atat* and *smârta* are used in the sûtra. The commentators interpret the term *atat* into *not that*, that is, not that which is Pradhâna or the Prakriti or the motive power of the Sânkhyas. *Atat*, therefore, is Brahma. The term *Smârta* is again interpreted into that which is described by Sânkhyas whose system was known as a Smriti—a fact useful for fixing the chronology of the system itself. According to the Sânkhya-system, the Prakriti is the principal entity. The Prakriti is defined to be the combination of the Satva, Tamas and Rajas qualities in a state of equilibrium. The Prakriti is really material, and wants intelligence; while Brahma is intelligent and spiritual. It is for this reason that Brahma is described. Described where? In the following texts of the Upanisads. The Manu-Smriti states— "that which is inscrutable, which cannot be particularly known, which is, as it were, overtaken on all sides by sound sleep—that is Brahma." The Bri-

नव्हे ह्मणजे ब्रह्म असा करतात, आणि स्मार्त ह्मणजे प्रधान सांख्यांतील प्रकृति. स्मृतिमध्यें वर्णिलेले ते स्मार्त. स्मृति अशी सांख्य शास्त्राची प्रसिद्धि झाली होती. ही गोष्ट कालक्रम बसविण्याच्या उपयोगी पडेल. सांख्य सिद्धांताप्रमाणें प्रकृतिच मुख्य आहे. सत्वगुण, रजोगुण आणि तमोगुण या तिन्हींची समतोल अवस्था जेव्हां असते तेव्हां त्यास प्रकृति असें ह्मणतात. ही प्रकृति वास्तविक जड आहे. आणि ब्रह्म जड नाही, सचेतन आहे. या कारणामुळें ब्रह्माचे निरूपण झालें आहे. कोठें वर्णन झालें आहे? उपनिषदांतील पुढील वाक्यामध्यें. मनुस्मृतींत असें ह्मटलें आहे की ज्याचा तर्क करतां येत नाहीं, जें विशेष जाणतां येत नाहीं, जें जणुं चोहोंकडून गाढ झोंप लागल्यासारखें तें ब्रह्म. ईश्वर कसा आहे हें बृह० उपनिषदांत वर्णिलें आहे. "तो (स्वतः) अदृष्ट असून पाहणारा. (स्वतः) ऐकण्यांत न आलेला असून ऐकणारा. (स्वतः) मनन करण्यांत न आला असून मनन करणारा. विशेष जाणण्यांत न येतां विशेष जाणणारा." "पुनः (हा) दृष्टीच्या पाहणाऱ्यास न पाहावयाचा." या उपनिषद्वाक्यांचा विचार केला असतां यामध्यें दोन प्रकारचें वर्णन आलें आहे. एक न पाहण्यांत येणारा, आणि दुसरें, पाहणारा. शंकराचार्य असें ह्मणतात कीं, एकपरी पहिलें वर्णन सांख्य प्रकृतीस लागू पडेल पण दुसरें वर्णन कधींहि लागू पडणार नाहीं. आणि उपनिषद्वाक्यांत वर्णन तर असें आहे कीं हे ब्रह्माचे गुण ह्म-

hadâranyaka describes God in the following way. "(Himself) unseen, he sees: (himself) unheard, he hears: (himself) not (adequately) meditated, he meditates: (himself) not particularly known, he knows." "Again he may not see Him, who sees the sight." When these Upanisad-texts are examined, they discover two kinds of statements. The first is that God is not seen; the second is that He sees. Shankarâchârya observes :—that in one sense the first description may apply to Sânkhya-Prakriti; but the second description can never apply to it; while the Upanisad distinctly states that they are the properties of Brahma itself. They are, therefore, not the properties of Sânkhya-Prakriti, it being material. About this Râmânuja observes :—Prakriti, as described in the Sânkhya-system, is material, is not omniscient, does not govern the universe, and is not its spirit. It is not, therefore, Brahma. Madhvâchârya observes.—that the Supreme Spirit, which moves our spir, it is distinct from the Prakriti of the Sânkhyas; because in connection with the Supreme Spirit, the qualities—Satva, Tamas and Rajas—are not mentioned. Vallabha observes:—"Let us raise a doubt. In the spiritual system or the Brahma Vidyâ, the inner controller is not known. The human spirit, the Supreme Spirit, and matter are, indeed, well-known. The qualities described in the Sânkhya-system are to be found in the *Antaryâmi* or the inner controller. What is the good then of identifying the Supreme Brahma with the Antar-

णून सांख्य शास्त्रांतील प्रकृति ब्रह्म नव्हे: कारण प्रकृति अचेतन आहे. यावर रामानुजाचें म्हणणें असें पडलें कीं सांख्य स्मृतीमध्यें वर्णिलेली जी प्रकृति तिला चेतना नाहीं, सर्वज्ञत्व नाहीं, सर्वनियंतृत्व नाहीं, सर्वांचा आत्मा ती नव्हे, म्हणून ती ब्रह्म नव्हे. मध्वाचार्यांचें म्हणणें असें पडलें कीं अंतर्यामी आमच्या जीवास प्रेरणा करणारा परमात्मा तो भिन्न आणि सांख्य शास्त्रांतील प्रकृति ती भिन्न. कारण सत्व, तम, रज, आदि गुणांचें वर्णन झालें नाहीं. वल्लभ म्हणतात कीं पूर्वपक्ष करूं या. ब्रह्मविद्येमध्यें अंतर्यामी मुळींच कोठें प्रसिद्ध नाहीं. जीव, ब्रह्म, जड, यांचीच प्रसिद्धि आहे. सांख्य स्मृतींत वर्णिलेले गुण अंतर्यामीमध्यें आहेत. मग तेंच ब्रह्म असें मानून काय उपयोग? पण असें नाहीं. अंतर्यामी तेंच ब्रह्म. या संबंधानें आम्ही वर्णिलेला अंतर्यामी ब्राह्मण पहावा. मागील सूत्रीं पुढील सूत्रांतील शारीर हें पद रामानुजांनीं याच सूत्रांत घेतलें आहे. आणि शारीर म्हणजे जीव, हें ब्रह्म नव्हे असें वर्णिलें आहे. याची संगति पुढील सूत्रावरून नीट समजेल.

yâmî? But they are identical—the Antaryâmî and Brahma. See in this connection the Antaryâmî-Brâhmana quoted under the preceding sûtra. Râmânuja amalgamates the term *shârîra* of the next sûtra with this sûtra and interprets it into—*it is not Brahma.* The connection of this statement will be seen from the note on the next sûtra.

शारीरश्चोभयेऽपि हि भेदेनैनमधीयते ॥ २० ॥

भावार्थः। नेति पूर्वसूत्रादनुवर्तते। शारीरो जीवः सोंऽतर्यामिणो भिन्नः। उभये माध्यंदिनाः काण्वाश्च। इत्थमेनमंतर्यामिणमामनंति ॥ तत्र शंकरो भेदनिरूपणं व्यवस्थापयति। यद्यपि द्रष्टृत्वादयो धर्मास्तस्य संभवंति तथापि घटाकाशवदुपाधिपरिच्छिन्नत्वाद् न स कार्त्स्न्येन पृथिव्यादिष्वंतरवस्थातुं नियंतुं च शक्नोतीति ॥ रामानुजः अतोंऽतर्यामी प्रत्यगात्मनो विलक्षणोऽपहतपाप्मा परमात्मा नारायण इति सिद्धमिति ॥ मध्वस्तु शीर्यंते नित्यमेवास्माद् विष्णोस्तु जगदीदृशं। रमते च परो ह्यस्मिन् शरीरं तस्य तद् जगदिति वचनाद् न शारीरत्वविरोध इति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

यो विज्ञाने तिष्ठन्। + यस्य विज्ञानं शरीरं। बृ० आ० उ० (३.७,२२.)॥ य आत्मनि तिष्ठन् + नान्योऽस्ति द्रष्टा। बृ० आ० उ० (३.७,२३.)॥ यत्र हि द्वैतमिव भवति। तदितर इतरं पश्यति। + + + यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्। तत् केन कं पश्येत्। बृ० आ० उ० (२.४,१६.)॥

२९. प्रकरणावरून उत्पत्तिवाक्य नसल्यामुळें शमिता भिन्न नाहीं. (सि०).

29. (The Shamitâ-priest is included), because (this is determined) by means of context and not by an original Vedic text.

गाण्यांत साहाय्य देणारे हे पृथक् नाहींत हा विचार.

THE SUBJECT THAT THE ASSISTANT SINGERS ARE INCLUDED.

३०. आणि गाण्यांत साहाय्य देणारे (पृथक् नाहींत, कारण लिंगप्रमाण आढळतें).

30. The assistant singers (are not additional priests) because of the significant power of a Vedic text.

---

२९. वैदिकाचार्य म्हणतातः—बौद्धाचार्य, तुम्ही जो पूर्वपक्ष केला आहे तो योग्य नाहीं. कोणत्या पाहिजे त्या ऋत्विजानें पशु मारला असतां चिंता नाहीं. जो पशु मारतो त्याचें नांव शमिता. मग तो ऋत्विज आपलें करायाचें काम करून हेंहि काम करतो. जेणेंकरून शमिताची नेमणूक होईल असें वेदवाक्य मुळींच नाहीं. प्रकरणावरून असें सिद्ध होतें कीं पशु मारण्याचें काम पाहिजे त्यानें करावें.

३०. जे ऋत्विज नेमलेले असतात, त्यांमधूनच कोणी गाण्यांत साहाय्य करतात. यांचें नांव उपग. हे सामान्य ऋत्विजांहून भिन्न नसतात. उपग शब्दाचा व्युत्पत्त्यर्थहि असाच आहे. आणि या संबंधानें जसें आम्ही म्हणतों तसेंच अनुमान काढतां येईल असें वेदवाक्य आहे. वेदार्थ करते वेळीं व्यवस्था करण्याची रीति आहे ती अशी. निषेध जर

29. The Vaidikâchârya observes:—Bouddhâchârya, the objection you have raised is not sound. Any ordinary priest can kill a sacrificial animal; and when he kills a sacrificial animal, he is called Shamitâ. And an ordinary priest does this work in addition to his own. Again, there is no Vedic text which prescribes the nomination of the Shamitâ-priest. A context distinctly shows that any ordinary officiating priest can kill a sacrificial animal and, for the time being, be called a Shamitâ.

30. The assistant singers are ordinary officiating priests; because they are so included. The etymology of the word supports this view. There is a direct Vedic text that the Adhvaryû-priest can not be an assistant singer. A negation presupposes a position. Any ordinary officiating priest, therefore, who is not an Adhvaryu, can be an assistant singer. See what the Vedic

सूत्राणि.

## सोमविक्रेतुः पृथक्त्वाऽधिकरणम् ॥

**विक्रयी त्वन्यः कर्मणोऽचोदितत्वात् ॥ ३१ ॥**

**भावार्थः** । यस्मादध्वर्य्वादीनां यानि कर्माणि तानि चोदितानि । तत्र च क्रयः संगृहीतः । परं तु विक्रयस्य न किं चिदप्युक्तं । यत्र क्रयस्तत्र विक्रयोऽवश्यं प्राप्नोति । अध्वर्य्वादीनां कर्मसु परिगणितेषु विक्रयस्तेभ्योऽन्येन करणीयः । तस्माद् विक्रयी अन्यः ॥

## ऋत्विगिति नाम्नोऽसर्वगामिताऽधिकरणम् ॥

**कर्मकार्यात् सर्वेषां ऋत्विक्त्वमविशेषात् ॥ ३२ ॥ (पू०)॥**

**भावार्थः** । क्रतौ ये यजंति ऋत्विजस्ते । ते सर्वे यागसाधनं कुर्वंति । इदमेव ऋत्विक्कर्म । तस्य विशेषतो व्यावर्तकं नास्ति । तस्माद् ये यागसाधकास्ते सर्वे ऋत्विजः । परिसंख्यया ऋत्विक्परिगणनमित्युक्तं चेन् न । ऋत्विक्समुदायात् सप्तदशग्रहणं । अवयुत्यवादोयं ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

**सौम्यस्य अध्वरस्य यज्ञक्रतोः सप्तदश ऋत्विजः ॥**

---

केला असला तर त्याची प्राप्ति असलीच पाहिजे, प्राप्तीवांचून निषेध होत नाहीं. वेदवाक्य कसें आहे तें पहा " अध्वर्यूनें गाण्यांत साहाय्य करूं नये." यावरून सहजच असें प्राप्त झालें कीं अध्वर्युवांचून बाकीच्या ऋत्विजांनीं साहाय्य करावें.

text upon the subject is: "The Adhvaryu is not to assist in singing." This necessarily implies that other priests than the Adhvaryu can assist in singing.

**सोम विकणारा निराळा असतो हा विचार.**

३१. पुनः, विकणारा तो दुसरा; कारण ऋत्विजांच्या कर्मामध्यें हें सांगितलें नाहीं.

**ऋत्विज असें ह्मटलें ह्मणजे सर्व कर्में त्यानें करायाचीं नाहींत हा विचार.**

३२. कर्म करायाचें ह्मणून सर्व ऋत्विजच. कारण कांहीं विशेष निरूपण नाहीं. (पू०).

THE SUBJECT THAT THE SELLER OF SOMA IS AN ADDITIONAL PRIEST.

31. Again, a seller is additional; because his function is not prescribed as that of an officiating priest.

THE SUBJECT THAT A *R*ITVIJA OR AN OFFICIATING PRIEST IS NOT TO PERFORM ALL SACRIFICIAL WORK, BECAUSE HE IS CALLED A *R*ITVIJA OR AN OFFICIATING PRIEST.

32. All those, who officiate, are *R*itvija, because there is no distinction made. (Opponent's statement.)

---

३१. अध्वर्यु आणि दुसऱ्या ऋत्विजांनीं कोणकोणतीं कर्मं करावात हे वेदांत सांगितलं आहे. त्यामध्यें त्यांनी सोम विकत घ्यावा असें सांगितलं आहे. परंतु तो विकावा कोणी याविषयीं वेदांत एक शब्द देखील नाही. सोम विकत घ्यावा म्हटलं म्हणजे तो कोणी तरी विकला पाहिजे. आणि ऋत्विजांनी विकायाचा नाहीं असें ह्मटलें तर विकणारा कोणी दुसरा पाहिजे.

३२. बौद्धाचार्य म्हणतात:—योग्यकाळीं जे यजन करतात ते ऋत्विज, असा ऋत्विज शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ आहे. ऋत्विज म्हटला ह्मणजे त्याच्या साहाय्यानें याग सिद्ध होतो. हेंच मग ऋत्विजाचे

31. The Veda prescribes the functions of the Adhvaryu and other officiating sacrificial priests, states that Soma is to be bought, and is silent as to who is to sell it. When Soma is to be purchased, some body must sell it; and when it is said that an officiating priest cannot sell it, because his functions are definitely laid down in the Veda, some body else must sell it.

32. The Bouddhâchârya observes:—those that sacrifice at a proper season are called *R*itvija. This is established by the etymology of the word. By the assistance of a *R*itvija-priest, a sacrifice is accomplished. Then to assist is the specific function of a *R*itvija-priest. To any thing special or any thing general, he

सूत्राणि.

न वा परिसंख्यानात् ॥ ३३ ॥ ( सि० ) ॥

भावार्थः । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । चरमसूत्रसंबंधेन यद् वेदवाक्यमनुसंहितं तत्तु परिसंख्यया सम्यग् व्यवतिष्ठते । वेदवाक्यं त्रिविधं । अपूर्वविधिरनुवादः परिसंख्यानं च । यदि नापूर्वविधिर्नानुवादश्च तर्हि परिसंख्यानमेव । परिसंख्यायां स्वार्थहानं परार्थकल्पना प्राप्तबाधश्च । अस्मिन् वेदवाक्ये स्वार्थहानं भवत्येव । तर्हि । प्राप्तबाधश्च कथं । क्रतौ ये यजंति ऋत्विजस्ते । तेन बहूनामृत्विजां ग्रहणं प्राप्तं तस्य बाधः । सप्तदश ग्रहणीया इत्यस्य स्वार्थस्य हानं । कथं । सप्तदशभ्योन्ये नेति परार्थकल्पनया स्पष्टं प्रकाश्यते । तस्मात् परिसंख्यानं तत् ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

सौम्यस्य अध्वरस्य यज्ञक्रतोः सप्तदश ऋत्विजः ॥ जुव्हा जुहोति ॥

कर्म. अमुक विशेष कर्म, आणि अमुक सामान्य कर्म असें म्हणण्यास आतां अवकाश नाहीं. ऋत्विज कोण हें एव्हढ्या वरून सहज ओळखतां येतें. यागांत जे साहाय्य करतात ते ऋत्विज. परंतु असें म्हणणें योग्य नाहीं. कां तर सतरा ऋत्विज असावेत असें परिगणन केलें आहे. म्हणजे ही परिसंख्या झाली, असें वैदिकाचार्य तुम्ही म्हणाल. तर हें तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. वैदिकाचार्य ज्याला तुम्ही परिगणन किंवा परिसंख्या असें म्हणतां त्यासच आम्ही अवयुत्यवाद असें म्हणतों. अवयुत्यवाद म्हणजे काय तें पहा. अमुक लोकांनीं अमुक कर्म करावें असें एकदां ठरवून ठेवलें आहे. मग

cannot be expected to attend. Those, that officiate and assist at a sacrifice, are *Ritvija*. But such a proposition can not be admitted; because it conflicts with a Vedic text, which enumerates seventeen officiating priests. Such an enumeration, you consider Vaidikâchârya, to be a case of *Parisankhyâ* or exclusive specification. But your position is not sound. Vaidikâchârya, what you characterize as an enumeration or exclusive specification or Parisankhyâ, is characterized by us as *Avayutyavâda*. What is Avayutyavâda? A general description is given, which determines that so many things are to be done by such and such a class of priests. But when it is again laid down that any one of those

३३. तसें नव्हे; कारण परिसंख्या आहे. ( सि०).

हें काम त्यापैकीं अमुकानें करावें, असा संकोच केला म्हणजे त्यास अवयुत्यवाद असें म्हणतात. जसा जसा हा विचार पुढें होईल तसा तसा परिसंख्यावाद म्हणजे काय आणि अवयुत्यवाद म्हणजे काय हें वाचकांस समजेल. या संबंधानें जें वेदवाक्य आहे तें हें " सोमयागामध्यें सतरा ऋत्विज असतात."

३३. वैदिकाचार्य ह्मणतात:—बौद्धाचार्य, तुमचें असें म्हणणें ना की जे कोणी यज्ञसंबंधानें काम करतात ते ऋत्विज. या शास्त्रार्थीप्रमाणें सोमयागामध्यें सतरा ऋत्विज असावेत असें जें वेदवाक्य आहे, त्याची तुम्हास व्यवस्था करतां येईना. म्हणून तुह्मी ही अवयुत्यवादाची खटपट काढली. तुमचें ह्मणणें असें कीं जे कोणी यज्ञामध्यें काम करतात ते ऋत्विज. मग अशी ऋत्विजांची संख्या पाहिजे तेव्हढी असेल. मग असेंच सोमयागांत सतरा ऋत्विज असावेत असें वेदांत निरूपण केलें आहे. जो कोणी युद्ध करतो, तो शिपायी. मग एका व्यूहामध्यें सातशे शिपायी असावेत असें ह्मटलें ह्मणजे हाच अवयुत्यवाद. यामध्यें विशेष कांहीं नाहीं. बौद्धाचार्य, असें तुमचें ह्मणणें योग्य नाहीं. जें घेतलें आहे त्या वेदवाक्याची व्यवस्था अवयुत्यवाद म्हटल्यानें नीट लागत नाहीं. त्या वेदवाक्याची व्यवस्था नीट लावण्याकरितां मीमांसकांचें परिसं-

33. Not so; because of exclusive specification or Parisankhyâ. (Final statement.)

things is to be performed by a particular priest out of the class, this is the case of Avayutyavâda. There is a distinction then between Avayutyavâda and Parisankhyâ—a distinction the nature of which will be perceived by the reader as the controversy advances. The following is the translation of the Vedic text quoted in this connection. "There are seventeen officiating priests in a Soma-sacrifice."

33. The Vaidikâchârya observes:—Bouddhâchârya, you state that any one, that officiates at a sacrifice, is a *R*itvija or an officiating priest. Do you? But this definition cannot adjust the interpretation of the Vedic text, which prescribes that there should be seventeen officiating priests; because you cannot interpret this easily. You want to apply the principle of Avayutyavâda to support your statement—that any one, who officiates at a sacrifice, is a *R*itvija. Thus the number of officiating priests may be as large as possible. A special text, you say, restricts the number in the case of a Soma-sacrifice. Avayutyavâda is that in which a particular statement narrows the application of a general statement. He, who fights, is a soldier. In a particular battalion there must be seven hundred soldiers. Thus simply two statements are made, the relationship between which can be easily seen. This is simply Avayutyavâda. There is

ख्याप्रमाण लावलें पाहिजे. वेदवाक्यें तीन प्रकारची आहेत. एक अपूर्वविधि, दुसरें, अनुवाद, आणि तिसरें, परिसंख्या. ज्यां वेदवाक्याची अपूर्वविधीनें किंवा अनुवादानें व्यवस्था लागत नाही, त्याची व्यवस्था परिसंख्येच्या योगानें लावावी हें योग्य आहे. आतां परिसंख्या म्हणजे काय हेंहि सांगितलें पाहिजे. परिसंख्येंत तीन गोष्टीकडे लक्ष द्यावें लागतें. स्वार्थहानि, परार्थकल्पना. आणि प्राप्तबाध. यास दृष्टांत मीमांसक पंडित मांस खाण्याचा घेतात.

मांस खावें, अशी इच्छा स्वभावतः मनुष्यास होते. पांच पांच नखांचे जनावराचें मांस खाऊ नये, असे म्हटले म्हणजे स्वाभाविक इच्छा जी मनुष्यास प्राप्त झाली होती, तिचा बाध झाला. हा प्राप्तबाध. पुनः पांच पांच नखांचे जनावरांचें मांस खाऊं नये, हें वाक्य एकिकडेच राहिले. या वाक्याचा जो स्वार्थ तो सुटला. म्हणजे ज्या जनावरांस पांच पांच नख्या नाहींत त्यांचें मांस खावें असा अर्थ झाला. म्हणजे निषेधार्थ सुटला, ही स्वार्थहानि. आणि अमुक करावें म्हणून जो अर्थ निष्पन्न झाला, ही परार्थकल्पना. अशा प्रकारची परिसंख्या योजून सोमयज्ञामध्यें सतरा ऋत्विज असावेत या वेदवाक्याचा अर्थ करायाचा आहे. या ठिकाणीं प्राप्तबाध आहे, असें म्हणणें सहज निर्दोष आहे. या ठिकाणीं स्वार्थहानि कशी होते ती पहा. 'यथाकाळीं जे यजन करतात ते ऋत्विज' हा मुळचा अर्थ जातो. वेदामध्यें सांगितलेलीं जीं

nothing special about it. This is the way you explain your position, Bouddhâchârya. But your explanation is not correct. The Vedic text already quoted can not be adequately interpreted on the principle of Avayutyavâda. The principle of exclusive specification or Parisankhyâ, as recognized by Mîmânsakas must be applied. There are three kinds of Vedic texts—a text which makes an original statement, a text which reproduces what is already stated, and a text which makes exclusive specification. When a Vedic text can not be interpreted as belonging to the first or the second class, it must be referred to the third class. But what is the third class? What is Parisankhyâ? Three conditions are essential to Parisankhyâ. It is a statement in which its plain sense is set aside, some other sense is recognized, and what actually accrues is nullified. This is illustrated by Mîmânsakas by the practice of eating flesh. Man is naturally desirous to eat animal-food—the flesh of animals in general. His natural desire is controlled when a rule is laid down that he should not eat the flesh of those animals that have five, five nails. Thus what actually accrues is nullified. Again the plain sense of the text—that he should not eat the flesh of those animals that have five, five nails—is set aside. The text means that the flesh of those animals that have not five, five nails, is to be eaten. Thus the negative rule implies a positive permission. Thus some other sense is recognized. On the principle of such exclusive specification or Parisankhyâ, the

कामें करतात ते ऋत्विज अशा ह्या दुसऱ्या अर्थाची कल्पना होते. सर्वांस वेदाध्ययनावांचून ऋत्विज होण्याची जी इच्छा तिचा या विधीच्या योगानें बाध होतो ही स्वार्थहानि. म्हणून परिसंख्याप्रमाण योजावें हें योग्य. अशा प्रकारें पुष्कळ वेदवाक्यांची व्यवस्था करावी लागते. "जुहू-पात्र घेऊन तो हवन करतो" या वेदवाक्याची व्यवस्था करतांना याला अवयुत्यवाद कसा म्हणावा? या स्थळी पुष्कळ संख्येचे निरूपण होऊन त्यांतून लहान संख्या योजली, अशी व्यवस्था कोठें करतां येते? म्हणून या स्थळीं परिसंख्याप्रमाण योजतां येतें, हें बौद्धाचार्य, तुमच्या सहज लक्षांत येईल. म्हणून तुमचा अवयुत्यवाद एकीकडे राहूं द्या.

Vedic text that "in a Soma-sacrifice there should be seventeen officiating priests," is to be interpreted. It is no objection against this case of Parisankhyâ to say that the principle—what accrues naturally is nullified—does not apply. See how the principle—that the plain sense is set aside—applies. The original meaning of the term *Ritvija* is one who sacrifices in the proper season. This original sense is set aside and a new sense—a *Ritvija* is one who performs the sacrificial duties prescribed by the Veda—is recognized. The third principle does in one sense apply, inasmuch as every Ârya may naturally desire to be a *Ritvij*, whether he knows the Veda or not, whether he can perform the prescribed duties or not. This natural desire is controlled. Thus all the three principles, on which exclusive specification or Parisankhyâ is based, apply. Thus the interpretation of many Vedic texts is to be adjusted. "Taking the sacrificial vessel of the name of *Jûhu*, he makes an offering." "How does the principle of Avayutyavâda apply to the interpretation of this Vedic text? The essence of Avayutyavâda is—the limitation of a general statement of a number. What general statement does this Vedic text limit? Hence Bouddhâchârya, you will easily see, how the principle of exclusive specification or Parisankhyâ applies to the case of interpretation before us. Let your principle of Avayutya vâda, therefore, be set aside."

सूत्राणि.

पक्षेणेति चेत् ॥ ३४ ॥ (आ०) ॥

भावार्थः । भवतु परिसंख्यानं भवत्ववयुत्यवाद इति पूर्वपक्षोक्तिः ॥

न सर्वेषामनधिकारः ॥ ३५ ॥ (आ० नि०) ॥

भावार्थः । आचार्यो ब्रवीति । भो पूर्वपक्षकार अवयुत्यवादस्य किं रूपं । यत्र द्वे संख्ये निश्चिते । यत्र चैकस्यां संख्यायामन्यस्याः संख्याया अंतर्भावः । यथा द्वादशकपालेऽष्टाकपालस्य । तत्रावयुत्यवादः । अत्रत्वेकस्याः संख्यायाः परिगणनं न विद्यते । यथा हि क्रतौ ये यजंति ते ऋत्विजः । ते कतीति न निश्चितं । वेदवाक्येन तु सप्तदश ऋत्विज इति निर्णीतं । तस्माद् नावयुत्यवादोयं ॥

## दीक्षादक्षिणावाक्योक्तानामेव ब्रह्मादीनां सप्तदशर्त्विक्त्वाऽधिकरणम् ॥

नियमस्तु दक्षिणाभिः श्रुतिसंयोगात् ॥ ३६ ॥

भावार्थः । अनेके ऋत्विजः संति । तेषां कतमे ते सप्तदश इति प्रतिपदोक्तेन दक्षिणादानसंबंधेन निर्णेतुं शक्यते ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

ऋत्विग्भ्यो दक्षिणां ददाति ॥ अग्नीधे ददाति । + अश्वं ब्रह्मणे । + धेनुं होत्रे । अनड्वाहमध्वर्यवे । तै० ब्रा० (१.१,६,१०.) ॥

३४. हाहि पक्ष घेऊन असें म्हटलें तर. (आ०).

34. If (it be said that) by means of either principle (the Vedic text can be interpreted,) then? (Doubt.)

३५. तसें नव्हे; सर्व (ऋत्विजांविषयीं तें वेदवाक्य) लागूं पडत नाहीं. (आ० नि०).

35. Not so; that Vedic text does not sanction the power of all. (Doubt removed.)

ज्या वाक्यामध्यें दीक्षा आणि दक्षिणा यांचें वर्णन आहे, त्या वाक्यावरून ब्रह्मा आणि दुसरे ऋत्विज मिळून सतरा असावेत, हा विचार.

THE SUBJECT THAT IN THE VEDIC TEXT WHICH DESCRIBES INITIATIONS AND DONATIONS, THE NUMBER SEVENTEEN INCLUDES BRAHMÂ AND OTHER OFFICIATING PRIESTS.

३६. वेदवाक्यामध्यें दक्षिणेचें वर्णन आलें आहे. म्हणून नियम (करतां येतो).

36. Again, (a restrictive rule can be laid down) by means of the connection which the Vedic text has with donations.

---

३४. बौद्धाचार्य म्हणतातः—वैदिकाचार्य, "सोमयज्ञामध्यें सतरा ऋत्विज आहेत" या वेदवाक्याच्या अर्थाचा विचार चालला आहे. तुम्ही म्हणतां की परिसंख्या घेऊन या वेदवाक्याच्या अर्थाची व्यवस्था करावी. आम्ही म्हणतों कीं अवयुत्यवाद घेऊन त्या वेदवाक्याच्या अर्थाची व्यवस्था करावी. परिसंख्येविषयीं जीं तुम्ही प्रमाणें दिलीं, तेणेंकरून आमचें समाधान झालें नाहीं. आम्हास असें वाटतें कीं अवयुत्यवादाचें अजून खंडन झालें नाहीं. परंतु ज्या

34. The Bouddhâchârya observes:—Vaidikâchârya, the Vedic text we have to interpret is this—In a Soma-sacrifice there are seventeen *R*itvija or officiating priests. You say that the interpretation of this Vedic text is to be regulated by the principle of exclusive specification. I say that the principle of Avayutyavâda applies. I am not satisfied with your arguments for proving that the principle of Parisankhyâ applies. I still believe that Avayutyavâda is not refuted. But as you insist upon the application of the principle

सूत्राणि.

उक्त्वा च यजमानत्वं तेषां दीक्षाविधानात् ॥ ३७ ॥ (यु०)॥

भावार्थः । को यजमान इत्युक्त्वा वेदे येषां दीक्षाविधानं कृतं ते सप्तदशर्त्विज इत्युक्तं ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

अध्वर्युर्गृहपतिं दीक्षयित्वा ब्रह्माणं दीक्षयति । तत उद्गातारं । ततो होतारं । ततस्तं प्रतिप्रस्थाता दीक्षयित्वा अर्द्धिनो दीक्षयति । ब्राह्मणाच्छंसिनं ब्रह्मणः । प्रस्तोतारं उद्गातुः । मैत्रावरुणं होतुः । ततस्तं नेष्टा दीक्षयित्वा तृतीयिनो दीक्षयति । आग्नीधं ब्रह्मणः । प्रतिहर्तारं उद्गातुः । अच्छावाकं होतुः । ततस्तमुन्नेता दीक्षयित्वा पादिनो दीक्षयति । पोतारं ब्रह्मणः । सुब्रह्मण्यं उद्गातुः । ग्रावस्तुतं होतुः । ततस्तमन्यो ब्राह्मणो दीक्षयति । ब्रह्मचारी वाचार्यप्रेषितः ॥

---

अर्थी परिसंख्येविषयीं तुमचा आग्रह आहे, त्या अर्थी परिसंख्या कां होईना किंवा अवयुत्यवाद कां होईना? आमचें ह्मणणें असें आहे कीं दोन्हीहि रीतीनें वेदवाक्याची व्यवस्था करतां येते.

३५. वैदिकाचार्य ह्मणतातः—बौद्धाचार्य, तुह्मास अवयुत्यवाद काय हें ठाऊक नाहीं. दोन संख्यांचें निरूपण झालें आहे. आणि दोन्हीहि संख्या निश्चयानें वेदांत सांगितल्या आहेत. आणि एका संख्येमध्यें दुसऱ्या संख्येचा अंतर्भाव करतां येतो. ह्मणजे एका संख्येपेक्षां दुसरी संख्या लहान आहे. यास दृष्टांत घ्या. बारा कपालें असावींत असें एका यज्ञांत वर्णन केलें आहे. त्या बारा कपालांमध्येंच आठ कपालांचा अंतर्भाव होतो. या स्थळीं

of Pariśankhyâ, I give in and state that either principle, Parisankhyâ or Avayutyavâda, applies, and thus the interpretation of the Vedic text can be adjusted.

35. The Vaidikâchârya observes:—Bouddhâchârya, you do not know what the principle of Avayutyavâda is. When two numbers are definitely stated in the Veda, and when one number includes the other, that is, one number is larger than the other, the Avayutyavâda applies. Take an illustration. A Vedic text prescribes twelve potsherds for a particular sacrifice, and in the same connection describes eight potsherds—a number which is included in twelve. The Avayutyavâda applies to such a case. In the case of officiating priests such two numbers are not prescribed in the Veda, and, there-

**३७. आणि यजमानपणाचें वर्णन करून दीक्षा त्यांना कशी द्यावी हें वर्णन झालें आहे, म्हणून नियम करतां येतो. (सु०).**

**37. Having described what constitutes a sacrificer, the Veda describes their initiation. A definite number, therefore, can be fixed. (An argument in support of the final statement.)**

अवयुत्यवाद लागू पडतो. असें दोन्हीहि संख्यांचें परिगणन ऋत्विजाचे संबंधानें नाहीं. यथाकाळीं जे यजन करतात ते ऋत्विज. यावरून अमुक ऋत्विज असावेत असा निश्चय होत नाहीं. वेदामध्यें सतरा ऋत्विज असावेत असें स्पष्ट वर्णन आहे. एका संख्येचें स्पष्ट वर्णन आहे, दुसऱ्या संख्येविषयीं मुळीच निर्णय नाहीं. म्हणून "सोमयज्ञांत सतरा ऋत्विज असावेत" या वेदवाक्यास अवयुत्यवाद लागू होत नाहीं.

३६. ऋत्विज म्हणून पुष्कळ आहेत, त्यांमध्यें दक्षिणेचें वर्णन करतांना कोणत्या यज्ञामध्यें सतरा असावेत, हें प्रतिपदोक्त वेदांत सांगितलें आहे. म्हणून नियम करतां येतो. या संबंधानें जें वेदवाक्य आहे त्याचें भाषांतर पुढीलप्रमाणें. "ऋत्विजांना दक्षिणा देतो. प्रथम आग्नीध्राला देतो. घोडा ब्रह्याला, गाय होत्याला, बैल अध्वर्युला + + + बारापर्यंत देतो." या वेदवाक्यावरून ऋत्विजांचा आणि दक्षिणेचा कसा संबंध आहे, आणि किती ऋत्विज असावे

३७. 'अमुक यजमान' असें वेदाम-

fore, no definite number of officiating priests can be fixed without the guidance of the Veda which directly states that in a Soma-sacrifice, there should be seventeen officiating priests. Thus one number is definitely stated by the Veda, while no reference whatever is made to any other number. The principle of Avayutyavâda does not apply to the interpretation of the Vedic text that "in a Soma-sacrifice there are seventeen officiating priests."

36. There are many *Ritvija* or officiating priests. A Vedic text, describing the donations to be made to them in connection with different sacrifices, directly mentions seventeen officiating priests in the case of a Soma-sacrifice. Thus a restrictive rule can be laid down. The following is the translation of the Vedic text quoted in this connection. "He makes donations to the officiating priests. First to the Agnîdhra-priest: a horse to the Brahmâ-priest: a cow to the Hotâ-priest: a bullock to the Adhvaryu-priest; thus to twelve priests." This Vedic text shows how the number of officiating priests is connected with donations, and how many officiating priests there are in a sacrifice.

ध्यें वर्णन होऊन ज्यांना दीक्षा झाली आहे ते सतरा ऋत्विज असें वर्णन झालें आहे. या संबंधानें जें वेदवाक्य आहे, तें पाहिल्यानें सूत्रार्थ सहज लक्षांत येईल. "गृहपतीला दीक्षा दिल्यानंतर अध्वर्यु ब्रह्म्याला दीक्षा देतो. नंतर उद्गात्याला. नंतर होत्याला. मग त्याला (अध्वर्यूला) प्रतिप्रस्थाता दीक्षा देऊन दुसऱ्या ऋत्विजांना दीक्षा देतो. ब्रह्माच्या वर्गातील ब्राह्मणाच्छंसीला. उद्गात्याच्या वर्गातील प्रस्तोत्याला, होत्याच्या वर्गातील मैत्रावरुणाला. मग त्याला (प्रतिप्रस्तोत्याला) नेष्टा दीक्षा देऊन तिसऱ्याना दीक्षा देतो. ब्रह्याच्या वर्गातील आग्नीध्राला, उद्गात्याच्या वर्गातील प्रतिहर्त्याला आणि होत्याच्या वर्गातील अच्छावाकाला. मग त्याला (नेष्ट्याला) दीक्षा देऊन उन्नेता चवथ्याला दीक्षा देतो. ब्रह्माच्या वर्गातील पोत्याला, उद्गात्याच्या वर्गातील सुब्रह्मण्याला आणि होत्याच्या वर्गातील ग्रावस्तुताला. मग त्याला म्हणजे उन्नेत्याला, दुसरा ब्राह्मण दीक्षा देतो. (हा दुसरा ब्राह्मण) ब्रह्मचारी किंवा आचार्यांनी पाठविलेला." या वेदवाक्यामध्यें सोळा ऋत्विजांचीं नांवें आलीं आहेत. सोळा ऋत्विजांचे मिळून चार वर्ग करीत असत. एक अध्वर्यूचा गण. दुसरा, होत्याचा गण. तिसरा ब्रह्याचा गण. चवथा उद्गात्याचा गण. यावरून, चार ऋत्विज काय ते मुख्य. अध्वर्यु, होता, ब्रह्मा आणि उद्गाता. या चौघांमध्यें मुख्य कर्म काय तें अध्वर्यूचें. कारण अध्वर्यु–होता, ब्रह्मा, आणि उद्गाता यांस दीक्षा देतो.

37. The Veda first describes what a sacrificer is, and then the initiations of seventeen officiating priests. The sense of the sûtra will be plain, when the Vedic text, on which it is based, is examined. "Having initiated the sacrificer, the Adhvaryu-priest initiates the Brahmâ-priest, then the Udgâtâ-priest, then the Hotâ-priest. Then the Pratiprasthâtâ-priest, initiating him (Adhvaryu), initiates other priests —the Brâhmanâchchhansi-priest from the Brahmâ-class, the Prastotâ-priest from the Udgâtri-class, and the Maitrâvaruna-priest from the Hotri-class. Then the Nestri-priest, initiating him (Pratiprasthâtâ), initiates the third ones, the Agnîdhra-priest from the Brahmâ-class, the Pratihartâ-priest from the Udgâtri-class, and the Achchhâvâka-priest from the Hotri-class. Then the Unnetâ-priest, initiating him (Nestri) initiates the fourths—the Potâ-priest from the Brahmâ-class, the Subrahmanya-priest from the Udgâtri-class, and the Grâvastut-priest from the Hotri-class. Then him (Unnetâ) another Brâhmana initiates. (This another Brâhmana) is either sent by an Âchârya or is a bachelor." In this Vedic text the names of sixteen officiating priests are mentioned —sixteen officiating-priests divided into four classes. The first class of the Adhvaryu-priests, the second class of the Hotâ-priests, the third class of the Brahmâ-priests, and the fourth class of the Udgâtri-priests. Thus four officiating priests are principal—Adhvaryu, Hotâ, Brahmâ, and Udgâtâ. The brunt of sacrificial business falls upon the Adhvaryu,

आणि अध्वर्यूच्या हाताखालचे ऋत्विज क्रमानें होता, ब्रह्मा, आणि उद्गाता, यांच्या हाताखालच्या ऋत्विजास दीक्षा देतात.

because he initiates the Hotâ, Brahmâ and the Udgâtâ priests and the assistants of the Adhvaryu-priest initiate in order the assistants of the Hotâ, Brahmâ, and Udgâtri-priests.

| अध्वर्युगण. | होतृगण. | ब्रह्मगण. | उद्गातृगण. |
|---|---|---|---|
| अध्वर्यु. | होता. | ब्रह्मा. | उद्गाता. |
| प्रतिप्रस्थाता. | मैत्रावरुण. | ब्राह्मणाच्छंसी. | प्रस्तोता. |
| नेष्टा. | अच्छावाक. | आग्नीध्र. | प्रतिहर्ता. |
| उन्नेता. | ग्रावस्तुत्. | होता. | सुब्रह्मण्य. |

याप्रमाणें सोळा ऋत्विजांचें क्रमानें कोष्टक आहे. त्यावरुन वरील वेदवाक्याचा अर्थ लक्षांत येईल, आणि सूत्रहि समजेल.

A tabulated statement of the four classes of priests.—

| The class of the Adhvaryu. | The class the of Hotri. | The class of the Brahmâ. | The class of the Udgâtri. |
|---|---|---|---|
| Adhvaryu. | Hotâ. | Brahmâ | Udgâtâ. |
| Pratiprasthâtâ. | Maitrâvaruna. | Brâhmanâchchhansi. | Prastotâ. |
| Nestâ | Achchhâvâka- | Agnîdhra. | Pratihartâ. |
| Unnetâ | Grâvastut. | Hotâ. | Subrahmanya |

This statement will facilitate the interpretation of the sûtra in relation to the Vedic text quoted.

सूत्राणि.

## ऋत्विजां स्वामिसप्तदशत्वाऽधिकरणम् ॥

**स्वामिसप्तदशाः कर्मसामान्यात् ॥ ३८ ॥**

**भावार्थः** । षोडशर्त्विजः । तेषां नामानि वेदे निरूपितानि । यजमानः सप्तदशो वा सदस्यः सप्तदश इति प्रश्नः । तत्र सदस्यस्य वरणं परिक्रयणं चमसश्च विद्यंते । तस्मात् सदस्यः सप्तदश इति प्राप्ते उच्यते । स्वामी नाम यजमानः सप्तदशः किं कारणं । यज्ञे कर्तार ऋत्विजो भवंति । यज्ञे च कर्ता गृहपतिरित्याकारकं कर्मसामान्यं ॥

## आध्वर्यवादिष्वध्वर्य्वादीनां कर्तृतानियमाऽधिकरणम् ॥

**ते सर्वार्थाः प्रयुक्तत्वादग्नयश्च स्वकालत्वात् ॥ ३९ ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः** । उत्पत्तिवाक्येनाग्नयो यथा सर्वार्था भवंति तथा प्रयुक्तेषु सत्सु ऋत्विजां सर्वकर्मार्थता स्यात् । यागसंबंधि यत् किंचिदपि कर्म येन केन चिदृत्विजा कर्तव्यमिति पूर्वपक्षनिष्कर्षः॥

यजमान धरून सतरा ऋत्विज हा विचार.

THE SUBJECT THAT THE NUMBER SEVENTEEN INCLUDES A SACRIFICER.

३८. समान कर्म असल्यामुळें यजमानासुद्धां सतरा.

38. Because the sacrificial functions are common, a sacrificer completes the number seventeen.

अध्वर्यु आणि दुसरे जे ऋत्विज आहेत त्यांमध्यें तेच कर्तें असा नियम आहे हा विचार.

THE SUBJECT THAT SACRIFICING IS RESTRICTED TO THE ADHVARYU AND OTHER OFFICIATING PRIESTS.

३९. जसें त्यांच्या कालाचें वर्णन झालें असल्यामुळें अग्नि सर्व यज्ञांच्या उपयोगी पडतात, तसे ऋत्विज सर्व कर्मांच्या उपयोगी पडावे; कारण त्यांची अशीच योजना केली असते. (पू०).

39. The *R*itvij or officiating priests ought to perform all functions ; because they are to be employed for all functions as sacred fires are employed in all sacrifices, because the time is mentioned in the Veda. ( Opponent's statement.)

---

३८. "सोमयज्ञामध्यें सतरा ऋत्विज." असें वेदवाक्य आहे. आणि ज्यांचीं नांवें वेदामध्यें वर्णिलीं आहेत ते सोळा ऋत्विज. पुढें सतरांची भरती कशी करायाची? सतरावा यजमान धरायाचा किंवा सदस्य धरायाचा अशी पंचाईत पडली. सदस्य नांवाच्या ऋत्विजाची नेमणूक होते. त्याचें परिक्रयण म्हणजे मजुरी आहे. त्याला सोम पिण्याकरितां स्वतंत्र पेला आहे. म्हणून बौद्धाचार्य म्हणतात सतरावा सदस्. यावर वैदिकाचार्य उत्तर देतात, बौद्धाचार्य, सतरावा सदस्य

38. One Vedic text is, that there should be seventeen officiating priests in a Soma-sacrifice, while another Vedic text quoted under the last sûtra mentions only sixteen. How is the number seventeen to be made up? Is the Sadasya-priest or a sacrificer to be included among the seventeen? A priest of the name of Sadasya is nominated. His wages, in the form of donations to him is also fixed. He has an independent cup of his own for drinking Soma from. The Bouddhâchârya, therefore, states that the seventeenth is the Sadasya-

सूत्राणि.

तत्संयोगात् कर्मणो व्यवस्था स्यात् संयोगस्यार्थवत्त्वात् ॥ ४० ॥ ( सि० ) ॥

भावार्थः । संयोगस्यार्थवत्त्वाद् नाम व्युत्पत्त्याऽर्थो निर्णीयते तस्मादाध्वर्यवादीनां व्युत्पत्त्या कर्मव्यवस्था भवति । यथा हि । आध्वर्यवमध्वर्युणा हौत्रं होत्रा औद्गात्रमुद्गात्रेति ॥ माधवेन याऽत्राधिकरणव्यवस्था कृता सा न स्वीकृता । किं कारणं । चकारशब्दस्य तुल्यार्थत्वात् अस्माभिर्या व्यवस्था कृता सा कथं संगच्छते इति प्रेक्षावद्भिः परीक्षणीयं ॥

नव्हे. कारण यज्ञामध्यें यज्ञ करणारे ऋत्विज, आणि यज्ञ करणारा यजमान. असें त्यांचें कर्म समान आहे. पुनः वरील वेदवाक्यामध्यें गृहपतिला म्हणजे यजमानाला अध्वर्यु दीक्षा देतो असें वर्णन आहे. म्हणून सतरावा यजमान धरावा हें योग्य आहे.

३९. हें सूत्र भानगडीचें आहे. यामध्यें दोन गोष्टींचा विचार आहे अशी माधवांनीं व्यवस्था केली आहे. शबर स्वामींनी सूत्रार्थ मात्र केला आहे.

माधव म्हणतात कीं अग्न्याधान केव्हां करावें याचें यामध्यें निरूपण आहे. परंतु तसा प्रकार आम्हास दिसत नाहीं. कारण अग्न्याधानाविषयीं पूर्वीच्या सूत्रीं पुष्कळ* विचार झाला आहे. त्रोच विचार पुनः एथें करण्यात द्विरुक्तत्व दोष येईल. म्हणून आम्हास असें वाटतें कीं अग्न्याधानाचा दृष्टांत घेतला आहे. आणि कोणतें पाहिजे तें काम ऋत्विजानें करावें असा बौद्धाचार्यांनीं पूर्व-

priest. The Vaidikâchârya thus replies to him:—Bouddhâchârya, the Sadasya-priest cannot be the seventeenth; because the *Ṛ*itvij-priests and a sacrificer together perform a sacrifice. Thus the functions of these are common. Again the Adhvaryu-priest initiates the sacrificer as the Vedic text already quoted shows. The sacrificer, therefore, makes up the number seventeen.

39. The interpretation of this sûtra is difficult; because Mâdhava states that two questions are discussed in it. Commentator Shabara, on the contrary, offers only a general interpretation. Mâdhava states that this sûtra prescribes the time when Agnyâdhâna-sacrifice is to be performed. We cannot perceive how this statement of Mâdhava is correct. The subject of the Agnyâdhâna sacrifice is amply discussed in the sûtras already explained. See (III. 6, 14-15). Its renewal would involve tautology; we, therefore, believe that the subject of the Agnyâdhâna-sacri-

**४०. त्याच्या (नांवाच्या) संबंधावरून कर्माची व्यवस्था करतां येते; कारण त्या संबंधाचा अर्थ करतां येतो. (सि०).**

**40. From the relationship of the name, an adjustment of a sacrificial act can be made, because of the significant power of the relationship. (Final statement).**

पक्ष केला आहे. बौद्धाचार्य म्हणतात:—वैदिकाचार्य हें पहा. जसें अमुक काळीं अग्न्याधान करावें असें सांगितलें असतांहि जें अग्नि सिद्ध होतात ते कोणत्या पाहिजे त्या यज्ञांत योजितां येतात, तसें अमुक रीतीनें अमुक ऋत्विज नेमावेत असें सांगितलें असतांहि एकदां ऋत्विजाची नेमणूक झाली म्हणजे यज्ञसंबंधी कोणतें पाहिजे तें काम करण्यास त्यास योजावें. आणि अमुकच कर्म अमुक ऋत्विजानें करावें असें म्हणणे योग्य नाहींच. संस्कृतच पदाचा आम्हीं 'जसें तसें' असा अर्थ केला आहे.

४०. वैदिकाचार्य म्हणतात:—बौद्धाचार्य, तुम्ही समाख्याप्रमाण मानतां ना? तें या ठिकाणी लागू पडतें. व्युत्पत्तीचा संबंध या स्थळीं घ्यावयाचा. ऋत्विजाच्या नांवाच्या व्युत्पत्तिवरून अमक्या ऋत्विजांनीं अमुक काम करावें असा सिद्धांत करतां येतो. यास उदाहरण "आध्वर्यव कर्म अध्वर्यूनें करावें. हौत्र कर्म होत्यानें करावें. औद्गात्र कर्म उद्गात्यानें करावें." यावरून अमकें कर्म अमक्यानें करावें असें स्पष्ट सिद्ध होतें. आणि कोणतें पाहिजे तें कर्म कोणी पाहिजे त्यानें करावें असें तुमचें म्हणणें टिकत नाहीं.

fice is introduced into the sûtra by way of illustration by the Bouddhâchârya, who seeks to establish that any officiating priest may perform any sacrificial function he likes, there being no restrictive rule on the subject. The Bouddhâchârya observes:—Vaidikâchârya, see how this is. Though a particular time for the Agnyâdhâna-sacrifice is prescribed, yet fires so prepared are used in any sacrifice whatever, in the same manner though the nomination of every particular priest is prescribed, yet after his nomination an officiating priest may perform any sacrificial function, and, therefore, it is not correct to say that a particular sacrificial priest ought to perform a particular sacrificial function." We have interpreted the term *cha* used in the sûtra into a particle of comparison.

40. The Vaidikâchârya observes:—Bouddhâchârya, you admit the evidential power of an exegetical adjustment, do you? It applies in this place. The relationship based on etymology is to be understood, and we can determine from the etymology of the name of an officiating priest, the nature of a sacrificial function he has to perform. For instance, what is called *Âdhvaryava Karma* is a function to be performed by the Adhvaryu, and what is called *Houtra*

सूत्राणि.

## समाख्यायातकर्तृत्वस्यापि क्वचित् बाधाऽधिकरणम् ॥

### तस्योपदेशसमाख्यानेन निर्देशः ॥ ४१ ॥

भावार्थः। कः कर्तेति प्रतिपदोक्तवचनेन निर्दिश्यते। क्वचित् तु विशेषतः पदांशगतसमाख्यया। यथा हि पोत्रीया नेष्ट्रीया ऋक्। समाख्यारूपोत्सर्गशास्त्रस्यानेन सूत्रेणाऽपवादो निरूपितः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

तस्मात् मैत्रावरुणः प्रेष्यति चानु चाह ॥ पोत्रीयां नेष्ट्रीयां। तै०ब्रा० (३.१२,९,५.) ॥

### तद्वच्च लिंगदर्शनं ॥ ४२ ॥

भावार्थः। यथा पूर्वसूत्रे तिद्धांतितं तथा लिंगानि दृश्यंते। तानि त्वपवादशास्त्रदार्ढ्याय ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यत्र होतुः प्रातरनुवाकमनुब्रुवत उपशृणुयात् ॥ उद्गीथ उद्गातॄणामृचः प्रणव उक्थशंसिनां प्रतिहारो अध्वर्यूणां ॥ यो वा अध्वर्योः स्वं वेद स्ववानेव भवति। तै०सं० (३.१,२,३.) ॥ अस्य स्वं यद् वायव्यं वा चमसं वानन्वारभ्याश्रावयेत् (३.१,२,४.) ॥

---

४१. केव्हां केव्हां वेदामध्यें अमुक कर्म अमक्यानें करावें असें स्पष्ट वर्णन असतें. म्हणून व्युत्पत्तिवरून जो अर्थ निष्पन्न होतो तो अर्थ एकिकडे ठेवावा लागतो. समाख्या प्रमाणाचा बाध करावा लागतो. म्हणजे कोठें कोठें पदाच्या अंशाची व्युत्पत्ति घेऊन योजना करावी लागते. एर्णेकरूनहि सर्व पदांची व्युत्पत्ति एकिकडे ठेवण्यांत येते. असाहि समाख्या

*Karma* is a sacrificial function to be performed by the Hotâ-priest, and what is called *Oudgâtra-Karma* is a function to be performed by the Udgâtâ-priest. Thus what particular function a particular priest should perform can be known. Your statement, therefore, that any priest can perform any sacrificial function he likes, is not well-founded.

## समाख्यावरून अमक्याचें अमुक कर्म असें जें सिद्ध होतें त्यास कोठें कोठें बाध येतो हा विचार.

## THE SUBJECT: THAT THE PRINCIPLE—THE ETYMOLOGY OF A NAME DETERMINES THE NATURE OF A SACRIFICIAL FUNCTION TO BE PERFORMED BY AN OFFICIATING PRIEST—IS SOMETIMES SET ASIDE.

**४१. त्याचें ( कर्माचें ) प्रतिपदोक्त वर्णन आणि समाख्या असल्यामुळें तें स्पष्ट कळतें.**

**41. The nature of a sacrificial act is distinctly known by a direct statement and by an authoritative adjustment.**

**४२. पुनः त्याप्रमाणें, कारण वेदवाक्यें अढळतात.**

**42. Again, in like manner, because of the significant power of a Vedic text.**

---

प्रमाणाचा बाध होतो. या संबंधानें जीं वेदवाक्यें घेतलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें. "म्हणून मैत्रावरुण प्रैष देतो आणि मागून म्हणतो." "पोत्यानें म्हणायाच्या ऋचा ( पोत्रीया ). नेष्ट्यानें म्हणायाच्या ऋचा ( नेष्ट्रीया )."

४२ वेदवाक्यांचें भाषांतर केलें म्हणजे सूत्रार्थ सहज लक्षांत येईल. "ज्या ठिकाणीं प्रातःकाळीं अनुवाक म्हणणाऱ्या होत्याचें (म्हणणें) त्यानें ऐकावें." "उद्गात्याचें उद्गीत ( ऐकावें.)" "उक्थ म्हणणाऱ्याचे ऋचेसंबंधीं प्रणव म्हणजे ओंकार." "अध्वर्यूचा प्रतिहार म्हणजे साम गाण्याची तऱ्हा." "अरे, जो अध्वर्यूचें तथ्य जाणतो तो द्रव्यवान्च होतो." "जें ऐकिवतो तेंच अध्वर्यूचें तथ्य."

41. In some places of the Veda, it is distinctly stated that a particular sacrificial act is to be performed by a particular sacrificial priest. In such a case a direct statement over-rules an authoritative adjustment. The former applies, and the latter is set aside. Sometimes the etymology of a part of a word fixes its sense, and sets aside that sense which the etymology of the whole word indicates. Thus the authoritative adjustment based upon the etymology of a word is set aside, either by a direct statement or by the etymology of a part of a word. The following is the translation of the Vedic text quoted in this connection. The Maitrâvaruna-priest, therefore, gives orders and recites after ( another preist ). "Potrîya are the verses of the *R*ik-sanhitâ to be recited by the Potâ-priest." "Nestrîyâ are the verses of the

सूत्राणि.

## समुच्चितयोरनुवचनप्रैषयोर्मैत्रावरुणकर्तृकत्वा-ऽधिकरणम् ॥

**प्रैषानुवचनं मैत्रावरुणस्योपदेशात् ॥ ४३ ॥ ( पू० ) ॥**

भावार्थः । मैत्रावरुणस्यर्त्विजः सर्वेषु प्रैषेषु सर्वेष्वनुवचनेषु च कर्तव्यता । किं कारणं । वेदे निरूपणं ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यो दीक्षितो यदग्नीषोमीयं पशुमालभंते । तै०सं० (६.१,११,६.)

तस्मात् मैत्रावरुणः प्रेष्यति चानु चाह ॥

**पुरोऽनुवाक्याधिकारो वा प्रैषसन्निधानात् ॥ ४४ ॥ ( सि० ) ॥**

भावार्थः । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । पुरोनुवाक्यानां प्रैषसन्निधानं यत्र वर्तते तत्र मैत्रावरुणस्याधिकारो नामकर्तव्यता ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

तस्मात् मैत्रावरुणः प्रेष्यति चानु चाह ॥

*R*ik-sanhitâ to be recited by the Nestâ-priest."

42. The sense of the sûtra will be elucidated by the illustrative Vedic texts. "Where, he ought to listen to the Hotâ reciting an after-speech (Anuvâka)," "He ought to listen to the music of an Udgât*r*i-priest." "The syllable *om* or Pra*n*ava connected with the verses of the *R*ik-sanhitâ (as recited by him) who recites the Uktha." "The musical mode (Pratihâra) of the Adhvaryu-priest." "Well he, who knows the truth of the Adhvaryu-priest, indeed becomes wealthy." "That which is caused to be heard is the truth of the Adhvaryu."

अनुवचन आणि प्रैष यांशीं मिळून ज्याचें वर्णन केलें आहे तें ह्मणणें मित्रावरुण नांवाच्या ऋत्विजाचें कर्म हा विचार.

THE SUBJECT THAT WHAT IS DESCRIBED, AS CONNECTED WITH SACRIFICIAL ORDERS AND AFTER-RECITATION, IS THE FUNCTION OF THE MAITRÂVARUNA-PRIEST.

४३. वेदामध्यें स्पष्ट वर्णन आहे ह्मणून (फक्त) प्रैष आणि अनुवचन हीं मैत्रावरुणानें ह्मणावीं. (पू०).

43. Because of a direct Vedic statement, (only) to give orders and do the after-recitation (is the function of the Maitravaruna-priest.) (Opponent's statement).

४४. तसें नव्हे; ज्या ठिकाणीं प्रैष्याचें वर्णन केलें आहे, त्याजवळच पुरोनुवाक्यांचें वर्णन आहे. (ह्मणून त्या ह्मणणें) हा अधिकार (मैत्रावरुणाचा). (सि०).

44. Not so; the recitation of the Puronuvâkyas is mentioned in juxta-position of the description of sacrificial orders. The recitation of the Puronuvâkyâ is a function of the Maitrâvaruna-priest. (Final statement.)

---

४३. मैत्रावरुणानें कोणचें कर्म करावें याविषयीं विचार चालला आहे. बौद्धाचार्य म्हणतात, सर्व प्रसंगीं त्यानें अनुवचनें आणि प्रैष मात्र म्हणावे. कारण वेदामध्यें असें स्पष्ट वर्णन आहे. यासंबंधीं जें वेदवाक्य आलें आहे त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें. "जो दीक्षित जें अग्निष्टोमीय पशूला मारतो, त्यामागूनच मैत्रावरुण प्रैष देतो आणि अनुवचन म्हणतो."

43. The question is—what is the function of the Maitrâvaruna-priest? The Bouddhâchârya states:—on all sacrificial occasions, to give orders and to do the after-recitation is the function of the Maitrâvaruna-priest, because there is a direct Vedic text. The following is the translation of the Vedic text referred to. "The Maitrâvaruna-priest gives orders and recites after that Dîksita when he kills the Agnisomîya-sacrificial animal."

४४. वेदामध्यें प्रैष्याची आणि पुरोनुवाक्यांची सन्निधि आहे. म्हणून पुरो-

44. What are called sacrificial orders and Puronuvâkyâ are described in juxta-position in

सूत्राणि.

**प्रातरनुवाके च होतृदर्शनात् ॥ ४५ ॥ (यु०) ॥**

**भावार्थः** । प्रातरनुवाकसंबंधिहोतृकर्तृकता दृश्यते । तेन सर्वानुवचनेषु न मैत्रावरुणस्याधिकारः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यत्र होतुः प्रातरनुवाकमनुब्रुवत उपशृणुयात् तदाध्वर्युर्गृह्णीयात् ॥

## चमसहोमेऽध्वर्योः कर्तृताऽधिकरणम् ॥

**चमसांश्चमसाध्वर्यवः समाख्यानात् ॥ ४६ ॥ (पू०) ॥**

**भावार्थः** । चमसाध्वर्यवश्चमसान् जुहुयुः । किं कारणं । समाख्या । कथं । चमसेषु ये आध्वर्यवं कुर्वंति ते चमसाध्वर्यवः ॥

---

नुवाक्या मैत्रावरुणानें ह्मणाव्या. यासंबंधीं वेदवाक्य तें हें " तदनंतर मैत्रावरुण प्रेष देतो आणि अनुवचन ह्मणतो."

the Veda. The Puronuvâkyas, therefore, are to be recited by the Maitrâvaruna-priest. The following is the translation of the Vedic text in this connection. "After that the Maitrâvaruna gives orders and recites the after-speech."

४५. प्रातःकाळचे अनुवाक होत्यानें ह्मणावे असें अढळतें त्यावरून. (सु०).

45. Because a Vedic text is seen to be connected with the recitation of the morning-Anuvâka. (Argument in support of the final statement.)

## चमसामधील सोमाचा होम होत असतां अध्वर्यूंचें कर्म हा विचार.

## THE SUBJECT THAT THE ADHVARYU-PRIEST HAS A FUNCTION TO PERFORM, AS AN OBLATION OF THE SOMA-JUICE IS MADE FROM A CHAMASA-CUP.

४६. चमस पेल्यांतून चमस अध्वर्यूंनें (हवन करावें;) कारण समाख्या (अशी आहे). (पू०).

46. The Chamasâdhvaryu ought to make an oblation from Chamasa-cups, because of an authoritative adjustment. (Opponent's statement.)

---

४५. प्रातरनुवाक होता म्हणतो असें वेदांत स्पष्ट वर्णन आहे म्हणून अनुवचन म्हणण्याच्या सर्व प्रसंगी मैत्रावरुणाची योजना होत नाही. यासंबंधीं जें वेदवाक्य आहे तें असें. " जेव्हां होता सकाळचे अनुवाक म्हणत असतां त्यानें ऐकावें तेव्हां अध्यर्यूंने घ्यावें."

४६. चमस-अध्वर्यु कोणास ह्मणावें? चमस-अध्वर्यु शब्दाची व्युत्पत्ति काय? चमस पेले घेऊन जे हवन करतात ह्मणजें अध्वर्यूंचें काम करतात ते चमस-अध्वर्यु. मग ही व्युत्पत्ति हेंच समाख्याप्रमाण. या प्रमाणाच्या योगानें चमस पेल्यांतून हवन करणें झालें कीं चमसाध्वर्यूंचें काम आलें. असें बौद्धाचार्याचें म्हणणें पडलें.

45. The Veda distinctly states that the Hotâ recites what is called the morning-Anuvâka. As anuvâka is an after speech. The Maitrâvaruna, therefore, does not recite an after-speech on all sacrificial occasions. The following is the translation of the Vedic text in this connection. "He should listen to the Hotâ-priest reciting his after-speech in the morning; then the Adhvaryu-priest should take up."

46. Who is to be called the Chamasâdhvaryu-priest? What is the etymology of the word Chamasâdhvaryu? Chamasâdhvaryu are those who make an oblation from a Chamasa-cup; because they use a Chamasa-cup; their function is determined by etymology in which an authoritative adjustment consists. Hence the Bouddhâchârya states that when-

सूत्राणि.

**अध्वर्युर्वा तन्न्यायत्वात् ॥ ४७ ॥ ( सि० ) ॥**

भावार्थः । चमसाध्वर्युशब्दस्य व्युत्पत्तिः समाख्या वा यथा पूर्वपक्षकारेण दर्शिता तथा न । चमसेष्वेतेऽध्वर्युवद्भवंति ते चमसाध्वर्यवः । तेनाध्वर्योः प्राधान्यं चमसाध्वर्यूणां गौणता । गौणापेक्षया प्रधानस्याधिकारः । अन्यथाऽध्वर्युवच्चमसाध्वर्यूणां कर्तव्यतेति न संभवेत् ॥

**चमसे चान्यदर्शनात् ॥ ४८ ॥ ( यु० ) ॥**

भावार्थः । चमसविषये अन्यस्य कर्तव्यता स्वामिता च दृश्येते । चमसस्तु यजमानस्य कर्तव्यताचाध्वर्योः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

चमसांश्चमसाध्वर्यवे प्रयच्छति । तान् स वषट्कर्त्रे हरति ॥ यो वाध्वर्योः स्वं वेद स्ववानेव भवति । स्रुग्वा अध्वर्योः स्वं वायव्यमस्य स्वं चमसोऽस्य स्वं ॥

---

over Chamasa-cups are to be used, Chamasâdhvaryus are to officiate.

**४७. तसं नव्हे; त्याच न्यायानें अध्वर्यु (येतो.) (सि०).**

**४८. पुनः चमसाच्या संबंधानें दुसऱ्याचा संबंध अढळतो म्हणून. (यु०).**

४७. त्याच न्यायानें म्हणजे समाख्याप्रमाणानें अध्वर्यूनें चमस पेल्यांतून हवन करावें, असें सिद्ध होतें. वैदिकाचार्य म्हणतातः—बौद्धाचार्य, चमसाध्वर्युपदाच्या व्युत्पत्तीची जशी तुम्ही व्यवस्था करतां तशी होत नाहीं. चमसाध्वर्यु या सामासिक पदाचा असा विग्रह करावा. चमस पेल्यांतून अध्वर्युसारखे जे हवन करतात ते चमसाध्वर्यु. या रीतीनें अध्वर्यु मुख्य आणि चमसाध्वर्यु गौण. गौणापेक्षां प्रधानाची योग्यता मोठी. नाहीं तर गौण प्रधान हा संबंधच संभवायाचा नाही.

४८. वैदिकाचार्य म्हणतातः —बौद्धाचार्य पहा, चमसाविषयीं दुसऱ्याचीच योजना आणि दुसऱ्याचाच धनिपणा अढळतो. चमस पेल्याचा धनी यजमान. आणि चमस पेल्याचा उपयोग करायाचा अध्वर्यूनें. या संबंधीं जें वेदवाक्य आहे त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें. " चमस पेले तो चमसाध्वर्युला देतो. त्यांना तो वषट् करणाऱ्याकडे नेतो. अरे, जो अध्वर्यूचें स्वताचें पात्र जाणतो, तो स्वताचें पात्रधारण करणारा होतो. अध्वर्यूचें स्वताचें पात्र स्रुक्, त्याचें स्वताचें पात्र वायूस



47. Not so; because of (that) the same principle the Adhvaryu-priest (can officiate.) (Final statement.)

48. Again, because other priests are also seen to be connected with Chamasa-cups. (Argument in support of the final statement.)

47. *That principle* is the principle of authoritative adjustment (Samâkhyâ). By means of Samâkhyâ it is well proved that an Adhvaryu-priest can make an oblation from Chamasa-cups. The Vaidikâchârya observes:—Bouddhâchârya, the etymology and signification of the word, Chamasâdhvaryu, are not to be adjusted as you do. Chamasâdhvaryu is a compound word. Chamasadhvaryus are such priests as like Adhvaryu make oblations from Chamasa-cups. In this way the Adhvaryu-priest is principal and a Chamasâdhvaryu is subordinate. What is principal over-rules the subordinate; or else the relationship between the principal and its subordinate can not be maintained.

48. The Vaidikâchârya states:— " Bouddhâchârya, see this. In the case of Chamasa-cups, other than Chamasâdhvaryus are seen to own them and to use them. A sacrificer is the owner of Chamasa-cups which the Adhvaryu-priest uses." The following is the translation of the Vedic text. " He hands over the Chamasa-cups to the Chamasâdhvaryu; He hands them over to the Vasatkâra: well, he, who knows what sacrificial vessel belongs to the

सूत्राणि.

**अशक्तौ ते प्रतीयेरन् ॥ ४९ ॥ ( आ० नि० ) ॥**

**भावार्थः** । यदि चमसविषयेऽध्वर्योः कर्तव्यता यजमानस्य स्वामिता । तदा चमसाध्वर्यूणामवकाशो नास्तीति पूर्वपक्षे उच्यते । यदा व्यापृतत्वात् न शक्नोति अध्वर्युर्होतुं तदा समाख्यासामर्थ्यात् ते होष्यंतीति शबरः ॥

## श्येनवाजपेययोरनेककर्तृकताऽधिकरणम् ॥

**वेदोपदेशात्पूर्ववद्वेदान्यत्वे यथोपदेशं स्युः ॥ ५० ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः** । पूर्वेषु सूत्रेषु यथा सिद्धांतितं तथा सर्वत्र व्यवस्थेति पूर्वपक्षोक्तिः । यदि समाख्यया कर्मकर्तृत्वं सिध्यति तर्हि औद्गात्रे श्येनः समाख्यातः । आध्वर्यवे वाजपेयः । श्येनस्तर्हि उद्गातृभिः कर्तव्यः । अध्वर्युभिर्वाजपेयः । वेदेनान्यद् निरूपणं कृतं चेद् यथानिरूपितं कर्तव्यं नाम यत्र प्रत्यक्षं निरूपणं तत्र समाख्या न प्रवर्तते । यत्र प्रत्यक्षं निरूपणं नास्ति तत्र समाख्या प्रवर्तते इति पूर्वपक्षकारेण सूत्रस्योत्तरार्द्धेऽगीकृत्य पूर्वार्द्धे व्यवस्था प्रदर्शिता ॥

---

हवि अर्पण करायाचा, त्याचें स्वताचें पात्र चमस पेला."

Adhvaryu, holds his own vessel (in his own hands): the Adhvaryu's own vessel is *sruk*. (An oblation from) his own vessel is to be offered to the god Vâyu. His own vessel is a Chamasa-cup."

४९. शक्ति नसली तर ते समजावेत. (आ० नि०).

49. They are to be recognized, (these) wanting strength. (Doubt removed).

### श्येन आणि वाजपेय हे यज्ञ पुष्कळ ऋत्विजांनीं करावे हा विचार.

### THE SUBJECT THAT THE SACRIFICES OF SHYENA AND VÂJAPEYA ARE TO BE PERFORMED BY MANY PRIESTS.

५०. वेदांत निरूपण झालें असल्यामुळें पूर्वीप्रमाणें व्यवस्था करावी. वेदामध्यें दुसरा प्रकार असला तर जसें निरूपण असेल तसें करावें. (पू०).

50. In the case of a direct statement in the Veda (it is to be adjusted) as before. When it is otherwise, (an adjustment is to be made) as prescribed. (Opponent's statement.)

---

४९. वैदिकाचार्य म्हणतातः—बौद्धाचार्य चमसाच्या संबंधानें चमसाचा धनी जर यजमान आणि त्याचा उपयोग करणारा जर अध्वर्यु, तर चमसाध्वर्यूनें करायाचें काय? चमसाध्वर्यूला कांहीं इतिकर्तव्यता नाहीं. त्याला काम नाहीं. मग अव्यवस्था होईल असें बौद्धाचार्य तुमचें म्हणणें पडतें. पण अव्यवस्था होत नाहीं. जर अध्वर्यूला शक्ति नसली तर आणि अध्वर्यूच्या हातून हवन करण्याचें काम झालें नाहीं तर तें काम चमसाध्वर्यूनें करावें. म्हणजे चमसाध्वर्यूला काम झालें आणि समाख्या प्रमाणाची व्यवस्था लागली.

49. The Vaidikâchârya states:—if a sacrificer owns Chamasa-cups, and if the Adhvaryu-priest uses them, then the Chamasâdhvaryu-priests have nothing to do. What sacrificial functions are they to perform? If priests have no work, and are idle lookers-on, the sacrificial system is not properly adjusted. Is not this your position, Bouddhâchârya? No. The sacrificial system is properly adjusted, even when your statements are accepted. When the Adhvaryu-priest is weak, and can not personally make the necessary oblations, the Chamasâdhvaryus act for him. Thus the Chamasâdhvaryus are engaged, and the evidential power of etymology is adjusted.

५०. बौद्धाचार्य म्हणतातः— वैदिकाचार्य, समाख्या प्रमाण लागू करण्याविषयीं तुम्ही जी व्यवस्था केली ती व्यवस्था स्वीकारली असतां परिणाम

50. The Bouddhâchârya observes:—Vaidikâchârya, see what the consequences are, if the adjustment which you make for applying the principle of etymology (Samâkhyâ) be accepted.

सूत्राणि.

**तद्ग्रहणाद् वा स्वधर्मः स्यादधिकारसामर्थ्यात् सहांगैर-व्यक्तः शेषे ॥ ५१ ॥ ( सि० ) ॥**

भावार्थः । सूत्रस्यास्य चत्वारि दलानि संति । सर्वस्य वादस्य व्यवस्थापकं सूत्रमिदं । प्रथमदलेन पूर्वपक्षस्य निराकरणं । द्वितीयदलेन शास्त्रार्थः प्रतिपादितः । वेदोपदेशग्रहणेनर्त्विक्‌र्तृत्वरूपधर्मः स्थाप्यते । इयं तु प्रतिपदोक्तवचनस्य व्यवस्था। यत् प्रतिपदोक्तं तत् सहांगैः कर्तव्यं । तान्यंगानि च चोदकवचनसामर्थ्यात् प्राप्नुवंति । इयं तु चोदकवचनव्यवस्था । यत्र यः पदार्थश्चोदकवचनेन न निरूपितः तत्र समाख्यया नियमो भविष्यति ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

कंटकैर्वितुदंति ॥ चोषपुटकैरर्पयंति ॥

## इति तृतीयाध्यायस्य सप्तमः पादः ॥

काय होतो तो पहा. वेदामध्यें जसें निरूपण आहे, तसेंच आम्ही घेतों. तुमचें म्हणणे कायम ठेवतो. तुमचें म्हणणे असेना कीं शब्दाच्या व्युत्पत्तीवरून कोणत्या ऋत्विजानें कोणतें काम करावें हे सिद्ध होतें. बरें, वेदाची निरनिराळी कांडें पाडली आहेत. एका कांडाचें नांव औद्गात्र, दुसऱ्याचें नांव आध्वर्यव. औद्गात्र काडामध्यें जीं कर्में सांगितली आहेत तीं उद्गात्यानें करायाचीं. आध्वर्यव कांडामध्यें जीं कर्में सांगितलीं आहेत ती अध्वर्यूनें करायाचीं. अशीच ना तुमची व्यवस्था? ठीक. आतां परिणाम काय होतो तो पहा. बहिरीससाण्याच्या आकृती-

We take the direct statements of the Veda as they are made. We admit your statement. Is it not this? The etymology of words determines the functions of different priests. Well, the Vedas are divided into different chapters. The one, for instance, is called Âdhvaryava, and the other, Oudgâtra. All the functions, described in the Oudgâtra-chapter, are to be performed by the Udgâtâ-priest; and all the functions, described in the Âdhvaryava chapter, are to be performed by the Adhvaryu-priest. Is not this your adjustment? Now see what difficulty this adjustment lands us in. An altar in the form of a hawk is constructed. A sacred

**५१. तसें नव्हे; वर्णनामुळें (अंग) स्वताचा धर्म समजावा. चोदक वचनाच्या सामर्थ्यावरून अंगासहवर्तमान करावें. निरूपण नाहीं त्या बाकीच्या स्थळीं (समाख्या घ्यावी). (सि०).**

51. Not so ; because of a statement, it (expresses) one's own duty; because of the significant power of a *chodaka*-statement (a duty is to be performed) along with its constituent parts. In cases (where the Veda is silent) an authoritative adjustment should determine the precedence.

---

चा विटांचा ओटा रचायाचा, आणि त्यावर अग्नि सिद्ध करून त्यांत हवन करायाचें. याचें नांव श्येन यज्ञ. अशा श्येन यज्ञाचें वेदाच्या औद्गात्र कांडामध्यें वर्णन केलें आहे म्हणून श्येन यज्ञांतील सारी कर्में उद्गाता नांवाच्या ऋत्विजानें करावी, असें प्राप्त होतें. तसेच वेदाच्या आध्वर्यव कांडामध्यें वाजपेय यज्ञाचे वर्णन केले आहे. म्हणून वाजपेय यज्ञ अध्वर्यु ऋत्विजानें करावा असें प्राप्त होतें. वैदिकाचार्य, तुम्हांस हें पतकरतें काय? ज्या स्थळी वेदामध्यें प्रत्यक्ष अमक्यानें अमुक कर्म करावें म्हणून निरूपण केलें असतें, त्या स्थळीं, त्या निरूपणाच्या धोरणानें ऋत्विजाची योजना करावी असें आम्ही पतकरतों. सूत्राच्या प्रथम दळामध्यें समाख्या प्रमाणाची योजना आहे. आणि सूत्राच्या द्वितीयदळामध्यें श्रुतिप्रमाणाची योजना आहे.

५१. या सूत्राचीं चार दळें आहेत. प्रथम दळामध्यें पूर्वपक्षकाराचें सामान्य निराकरण केलें आहे. दुसऱ्या दळामध्यें शास्त्रार्थाचें निरूपण केलें आहे. तो शा-

fire is established upon it; and into it offerings are made. Such a sacrifice is called *Shyena* or hawk-sacrifice. The hawk-sacrifice is described in the Oudgâtra-chapter of the Veda. All the sacrificial functions whatever, connected with a hawk-sacrifice, are, therefore, to be performed by the Udgâtâ-priest. Again, the Vâjapeya-sacrifice is described in the Âdhvaryava-chapter of the Veda. All the sacrificial functions whatever, connected with the Vâjapeya-sacrifice, are, therefore, to be performed by the Adhvaryu-priest. These are the conclusions your adjustment lands us in. Do you accept them? My positon is—when a direct statement of the Veda prescribes certain functions to be performed by certain priests, it over-rules every other consideration. In the first part of the sûtra, the evidential power of an authoritative adjustment, and in the second part that of a direct statement, are examined by the opponent.

51. The sûtra consists of four parts. In the first part the statement of the opponent is negatived. In the second part an ex-

स्वार्थ असा. वेदांमध्यें प्रतिपदोक्त वर्णन केलें असलें म्हणजे अमक्या ऋत्विजानें अमुक करावें, हें स्पष्ट सिद्ध होतें. ही प्रतिपदोक्त वचनाची व्यवस्था; अशा रीतीनें श्रुतिप्रमाणाची योजना. तिसऱ्या दळामध्यें ज्याचें वेदामध्यें प्रतिपदोक्त वर्णन केलें आहे तें सांग करावें, असें वर्णिलें आहे. परंतु सांग कर्म करण्यास प्रमाण काय ? असें विचारल्यास चोदक वाक्याच्या योगानें अंगें कोणतीं हें समजतें. ही चोदक वचनाची व्यवस्था. ज्या स्थळी प्रतिपदोक्त वचनें नाहीत, ज्या स्थळी चोदक वचनें नाहीत, अशा स्थळीं समाख्या प्रमाणाची योजना करावी. ही समाख्या प्रमाणाची व्यवस्था. असा समाख्या प्रमाणाविषयीं नियम करतां येतो. या पादांतील एकंदर वादाचा उपसंहार या सूत्रीं केला आहे, आणि निरनिराळ्या प्रमाणांचा परस्पर संबंध दाखवून त्यांच्या बळाबळाविषयी सिद्धांत केला आहे.

egetical principle is re-stated. It is this. When the Veda makes a direct statement about the functions of officiating priests, the direct statement over-rules every consideration; and the functions are to be discharged as prescribed. This is the adjustment of a direct Vedic statement (shruti.) In the third part, the bearing of what are called Chodaka-texts is pointed out. The nature and the characteristic mark of a Chodaka-text have already been explained. It is stated in the sûtra that a Chodaka-text enforces the performance of a function along with its subordinate parts which it points out. This is the adjustment of a Chodaka-text. But when there are neither direct texts nor Chodaka-texts, by means of which a sacrificial function can be determined, an authoritative adjustment applies—an authoritative adjustment generally based upon etymology. This is the way the exegetical principle ( Samâkhyâ ) is brought to bear. This sûtra recapitulates all the the points of discussion in this chapter, and points out the relative power of the different exegetical proofs and their relation to each other.

## उपसंहार.

या पादामध्यें मुख्य अंगि, म्हणजे यागरूप क्रिया, तिचीं अंगें, आणि त्या अंगांचीं अंगें यांचा परस्पर संबंध काय हा विचार केला आहे. हा शास्त्रीय विचार आहे. शास्त्रीय विचारापेक्षां व्यावहारिक पद्धति प्रबळ आहे. व्यवहारामध्यें ज्या अडचणी येतात, आणि संसारामध्यें जे प्रसंग येतात, त्यांच्या धोरणानें लोकांमध्यें आचार आणि चाली उत्पन्न होतात असें आम्ही पूर्वी दाखविलें आहे. ज्या रीतीनें लोक संसार करतात त्याच रीतीनें त्यांचे धार्मिक आचार असतात. थोडा सूक्ष्म विचार केला म्हणजे लक्षांत येईल की शिकारी लोकांचा देव शिकारी असतो इतकेंच नाही तर त्या देवाची आराधना करण्याची पद्धतिहि शिकारी तऱ्हेचीच असते. तशाच रीतीनें प्राचीन . आर्यांमध्ये सन्निपत्योपकारक अशी राजनीति होती. मुख्य काय तो राजा आणि त्याला एकदम साहाय्य करणारे सरदार. आणि त्या सरदारांस साहाय्य करणारे दुसरे सरदार. या सरदारांनीं आपल्या सरदारांस साहाय्य केलें म्हणजे राजास सहज साहाय्य होत असे. हें सन्निपत्योपकारक कर्म. अशा प्रकारची राज्यपद्धति आमच्या देशांत पुष्कळ कालपर्यंत होती. त्या पद्धतीचें मुख्य तत्त्व हेंच कीं राजा स्वतंत्र आणि आपल्या सरदारांशीं त्याचा इतकाच संबंध की युद्धप्रसंगीं किंवा कांहीं करणें झालें म्हणजे त्याचे सरदार त्यास साहाय्य करीत. या

## SUMMARY.

This chapter points out the relationship between the principal sacrificial act or the qualified act, that is, the main sacrifice itself, and its constituent parts, and the constituent parts of these constituent parts. This classification is philosophical, but practical concerns are always more powerful than the necessities of philosophy. We have already shown how the institutions and customs of a nation originate in the difficulties and dangers of common life, and at what stage philosophy is introduced into the discussion of their nature. The religious notions of a nation are largely influenced by their notions of common life. A nation in the savage state worships blood-thirsty gods, and the mode of worship is in keeping with their notions about their gods. So also a nation in an advanced state of civilization has advanced notions of their gods and of their institutions. The ancient Âryas worked a political polity, involving the application of subordinate parts to the working of a harmonious whole. The principal person was the king himself, and he was directly helped by his own feudal barons. But these barons had in their turn their own vassals who directly helped them; and thus indirectly helped their king. Such a feudal system was understood in its different bearings by the ancient Âryas; and their philosophers naturally transferred the principle of the feudal system to their sacrificial institution for adjusting its relations.

प्रकारें त्याचे सरदार सर्व प्रकारें स्वतंत्र असत. जसें राजाचे स्वताचें दरबार, स्वताचा किल्ला, स्वताची फौज आणि स्वताचे कारखाने असत; तसेच त्याच्या सरदारांचे स्वताचे किल्ले, स्वताची दरबारें, स्वताच्या फौजा आणि स्वताचे कारखाने असत. आणि हे सरदार राजासारखेच स्वतंत्र असत. या सरदारांचेहि सरदार असत. त्यांचेहि किल्ले, दरबारें, फौजा आणि कारखाने असत. अशी परंपरा सर्व देशभर पसरली असे. या परंपरेमध्यें जसा परस्परांचा संबंध आणि प्रसंगवशात् एक क्रिया साधण्यावर सर्वांचें पर्यवसान, त्याचप्रमाणे एक यज्ञक्रिया साधण्यावर निरनिराळ्या क्रियेचें पर्यवसान. याग ही मुख्य क्रिया आणि ती साधण्याकरितां दुसरीं कांहीं कर्मे तिची अंगें. ह्या अंगांचा आणि मुख्य क्रियेचा साक्षात् संबंध असल्यामुळें, या अंगास आरादुपकारक अशी संज्ञा आहे. पण ती अंगें वास्तविक स्वतंत्र कर्मे, तीं अंगे साधण्याकरितां दुसरीं कर्मे त्यांची अंगे. अशी अंगें, त्यांचीं अंगें, आणि त्या अंगांचीं अंगें या सर्वांचें पर्यवसान साक्षात् किंवा परंपराद्वारा मुख्य क्रिया साधण्यावर. अशी जी याज्ञिक व्यवस्था मीमांसकांनीं केली, तिचा आणि त्यांमध्यें चालू असणाऱ्या राजकीय व्यवस्थेचा परस्पर संबंध आहे असें आम्हास वाटतें. याप्रमाणें याज्ञिक व्यवस्थेचें मूळ राजकीय व्यवस्था.

पुनः यज्ञामध्यें म्हटले म्हणजे मुख्य ऋत्विज चार. ब्रह्मा, होता, अध्वर्यु, आणि उद्गाता. परंतु सदतिसाव्या सूत्रांत जो

This principle is called Sannipatyopakâraka.

Again, the characteristic feature of the feudal system, as it obtained among the ancient Âryas, was that the king had nothing to do with the internal administration of a baron's estate. A baron was an independent prince to all intents and purposes, with only one exception, that he was bound to render assistance to the king in war by joining him with his own soldiers. As the king had his own court, his own fort, his own army and his own offices, so a baron had his own court, his own fort, and his own offices. There was only one king, while there were many such barons—each baron in his turn had a number of subordinate barons, each of these last two had his own court, his own fort, his own army and his own offices, of course, on a scale smaller than that of the barons. In this system the barons as well as their vassals were independent of each other and of the king, and yet they all contributed at a particular juncture to the prosperity and truimph of the king, inasmuch as they fought along with one another in the same battle and against a common enemy.

In like manner the main sacrifice was the principal act to which subordinate acts contribute; subordinate acts having in their turn their own subordinate acts. The subordinate acts, which directly contribute to the main act, are characterized by Mîmânsakas as Âradupakâraka. Those subordinate acts,' which, through the medium of other subordinate acts,

## २०. जीव ब्रह्म नव्हे; कारण त्यास दोघेहि भेद आहे असें निरूपण करतात.

## 20. The human spirit is not Brahma; because both state that there is a distinction between the two.

२०. आठराव्या सूत्रांतून अंतर्यामी पदाची अनुवृत्ति चालली आहे. अंतर्यामी म्हणजे ब्रह्म. नाहीं या पदाची अनुवृत्ति एकोणीसाव्या सूत्रांतून आली आहे. माध्यंदिन शाखेंतील आणि काण्व शाखेंतील जन जीव भिन्न आणि अंतर्यामी म्हणजे ब्रह्म भिन्न असें वर्णन करतात. तें असें. काण्व म्हणतात "जो विज्ञानामध्यें म्हणजे जीवामध्यें, राहत आहे." माध्यंदिन म्हणतात "जो आत्म्याच्याठायीं राहत आहे." या दोन वाक्यांमध्यें ब्रह्म भिन्न आणि जीव भिन्न असें वर्णन आहे असें सिद्ध होतें. हें शंकराचार्यास पतकरेना. ते हा भेद नाहीं असें सिद्ध करण्यास झटतात. ते असें म्हणतात कीं जीवाच्या अंगीं पाहणें आणि दुसरे धर्म आहेतच. तथापि जीव उपाधीच्या स्वाधीन सांपडला असल्यामुळें आकाश जसें एखाद्या भांड्यांत कोंडावें तशी त्याची स्थिति झाली आहे. त्याच्या शक्तीचा संकोच झाला आहे. म्हणून सर्व पृथ्वी आणि आकाश यांस व्यापून त्यांचें नियमन करण्यास आज तो समर्थ नाहीं. पण उपाधींतून सुटला म्हणजे जीव जें पाहिजे तें करण्यास सिद्ध होतो. जीव तेंच ब्रह्म. सूत्रामध्यें जीव ब्रह्म नाहीं असें स्पष्ट वर्णन आहे. या स्पष्ट वर्णनाची व्यवस्था करून जीव तेंच ब्रह्म असें शंक-

20. The term *Antaryâmî* comes from the preceding sûtra by way of *Anuvritti*. Antaryâmî is Brahma. The term *not* also comes down from the nineteenth sûtra by way of *anuvritti*. The followers of Mâdhyandina and Kâṇva shâkhas or Vedic recensions state that the Antaryâmî or Brahma is distinct from the human spirit. How is this? "The kâṇvas state:—He, who abides in preeminent knowledge or in the human spirit." "The Mâdhyandinas state that he, who abides in the Âtmâ." Thus these two texts state that the human spirit or *Jîva* is distinct from the Supreme Spirit or Brahma. This Shankarâchârya can not relish, and, therefore, seeks to establish that the two are identical. He observes:—though the human spirit possesses the power of seeing and other properties of the Supreme Spirit, yet because it is in the power of Upâdhi or an enveloping condition, it is like æther which a small vessel holds. This æther is identical with universal æther and appears to be distinct from it on account of its being confined in a small vessel. The human spirit is not now able to engross the whole universe, the earth and the heavens and to regulate it; because its power is contracted by Upâdhi or the enveloping condition from which, when delivered, the human spirit will be able

राचार्य कसें दाखवितात हें समजत नाहीं. कोणी अद्वैतवादी उपासनेकरितांच हा भेद वर्णिलेला आहे, वास्तविक भेद नाहीं, असें म्हणतात. कोणी हें पूर्वपक्षसूत्र आहे असें म्हणतात. या सूत्राच्या योगानें अद्वैतवाद्यास अडचण उत्पन्न होते इतकें तरी सिद्ध होतें. रामानुज असें म्हणतात कीं अंतर्यामी म्हणजे परमेश्वर तो निराळा, तो विलक्षण. आणि जीव निराळा तो विलक्षण. अंतर्यामी म्हणजे नारायण, ह्यानें पाप्मा नांवाच्या पुरुषास निर्दाळून टाकलें आहे. रामानुजाच्या मतामध्यें जितका द्वैतवाद आहे, तितक्यापुरतें हें सूत्र त्यास साधक आहे. मध्वाचार्यांनीं एक वाक्य घेतलें आहे, आणि त्या वाक्यावरून या सूत्राचा अर्थ बसवितात. त्याचा प्रसंग असा. "ज्याचें विज्ञान म्हणजे जीव हें शरीर," असें बृहदारण्यकामध्यें अंतर्यामीचें किंवा ब्रह्माचें निरूपण आहे. या उपनिषद्वाक्याची व्यवस्था मध्वाचार्य पुराणांतील वाक्य घेऊन करतात त्या वाक्याचें भाषांतर एणेंप्रमाणें. "ह्या विष्णूच्या हातून नित्यच ह्या जगताचा नाश होतो, आणि तो पर म्हणजे ईश्वर यामध्यें रमतो; म्हणून जगत हें त्याचें शरीर." अशा रीतीनें उपनिषदांतील शारीर या पदाचा अर्थ मध्वाचार्यांनीं केला आहे. वल्लभाचार्य अद्वैतपर हें सूत्र लावतात. सूत्रार्थ इतकाच आहे कीं जीव ब्रह्म नव्हे, कारण माध्यंदिन आणि काण्व हे भेद आहे असें अध्ययन करतात. यासंबंधीं उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें.

to accomplish any thing and every thing. Hence the human spirit is the Supreme Spirit. The sûtra, however, distinctly states that the human spirit or *jîva* is not the Supreme Spirit or Brahma. We cannot see on what grounds this distinct statement is ignored by Shankarâchârya, and a new adjustment of the sûtra is proposed. Some Advaitas or Pantheists state that a distinction between the human spirit and the Supreme Spirit is inculcated in the sûtra merely to enable human beings to worship the Supreme Spirit; but that there is no real distinction between the two. Others state that this is merely an opponent's statement or Pûrva-paksa. It is plain, however, that this sûtra comes in the way of Pantheism. Râmânuja states:—the Antaryâmî or God is distinct and different from the human spirit. The Antaryâmî is Nârâyana, who has destroyed personal Sin or Pâpmâ. This sûtra supports the dualism of Râmânuja so far as it is recognized by him. Madhvâchârya quotes a text and adjusts the interpretation of this sûtra in his way. The text is taken from the Brihadâranyaka. "He, whose body is knowledge or the human spirit." To interpret this text, a text from a Purâna is quoted. "This Visnu continually washes away this universe, and he continually and joyfully abides in it; therefore, the universe is his body." The term *Shârîra* used in the sûtra is cut up by Mâdhvâchârya and interpreted as in the text of the Purâna. Vallabhâchârya interprets the sûtra as entirely supporting his Pantheistic

सूत्राणि.

**अदृश्यत्वादिगुणको धर्मोक्तेः ॥ २१ ॥**

**भावार्थः**। अदृश्यत्वादिगुणकं किं प्रधानमुत जीव उत परब्रह्म परमेश्वर इति पूर्वपक्षः । सिद्धांतस्तु परब्रह्मधर्मनिरूपणात् परब्रह्मैव ॥ तत्र शंकरो विद्याद्वयं व्यवस्थापयति । सा च ब्रह्मविद्या समाख्या । तदधिगम्यस्याक्षरस्याऽब्रह्मत्वे बाधिता स्यात् । अपरग्वेदादिलक्षणा कर्मविद्या ब्रह्मविद्योपक्रमे उपन्यस्यते ब्रह्मविद्याप्रशंसायै इति ॥ रामानुजः तस्मात् परत्वं च समष्टिपुरुषस्यैव प्रसिद्धं । तदधिष्ठितं च प्रधानं महदादिविशेषपर्यंतं विकारजातं प्रसूत इति ॥ मध्वः अथ परा यया स हरिर्वेदितव्यो योसावदृश्यो निर्गुणः परः परमात्मेत्यादिना तद्धर्मत्वेनावगतपरविद्याविषयत्वोक्तेर्विष्णुरेवादृश्यत्वादिगुणक इति ॥ वल्लभः अदृश्यत्वादिगुणकः परमात्मैव । ब्रह्मविज्ञानेनैव सर्वविज्ञानात् । तत एव विद्याया अपि परत्वं । अक्षरस्यापि ब्रह्मत्वं पुरुषस्यापि तयोः परापरभावेऽभेदश्च । एतादृश एव हि ब्रह्मवादः । तत्र प्रथममक्षरस्य ब्रह्मत्वमाह । अदृश्यत्वादिगुणकः परमात्मैव । कुतः । धर्मोक्तेः । तथाक्षरात् संभवतीह विश्वमिति ॥ पुरुषस्य ब्रह्मत्वं निःसंदिग्धमेव । ईषदानंदतिरोभावेन ब्रह्माक्षरमुच्यते । प्रकटानंदः पुरुष इति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अथ परा यया तदक्षरमधिगम्यते । यत् तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादं नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद् भूतयोनिं परि पश्यंति धीराः । यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवंति । यथा सतः पुरुषात् केशलोमानि तथाऽक्षरात् संभवतीह विश्वं । मुं० उ० ( १.१,७.) ॥ अक्षरात् परतः परः । मुं०

उ० ( २.१,२.) ॥ यः सर्वज्ञः सर्वविद् यस्य ज्ञानमयं तपः । तस्मादेतद् ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते । मुं० उ० ( १.१,९.) ॥ येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्यां । मुं० उ० ( १.२,१३.) ॥ कस्मिन् नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति । मुं० उ० ( १.१,३.) ॥ स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह । मुं० उ० ( १.१,१.) ॥ प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म । एतच् छ्रेयो येऽभिनंदंति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यंति । मुं०उ०(१.२,७.) ॥ परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायान् नास्त्यकृतः कृतेन । तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभि गच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं । मुं० उ० ( १.२;१२.) ॥

---

**२१. न दिसणें इत्यादि गुण ब्रह्माचे; कारण अशा धर्मांचें निरूपण आहे.**

“ जो विज्ञान म्हणजे जीवामध्ये राहतो, ++ विज्ञान ज्याचें शरीर.” “ जो आत्म्याच्याठायी राहतो. × दुसरा पाहणारा नाहीं.” “ कारण जेथे द्वैतभासासारखें असतें, तेथें एक ( दुसरा ) दुसऱ्याला पाहतो. आणि जेथें ह्याला सर्वच आत्मा होऊन राहतें, तेथें ( कोणी ) कोणास पहावें?” ही वाक्ये बृहदारण्यक-उपनिषदांत येतात.

२१. पुढील उपनिषद्वाक्याची व्यवस्था करायाची आहे. त्यामध्ये ज्या धर्मांचें निरूपण केलें आहे, ते धर्म ब्रह्माचे इतकाच सूत्रांत सिद्धांत आहे. आतां जे धर्म वर्णिले आहेत, ते कां प्रकृतीचे, कां जीवाचे, कीं परब्रह्माचे असे पूर्वपक्ष क-

**21. Invisibility and other properties ( the Supreme Spirit or Brahma possesses ), because they are (so) described.**

system. The sense of the sûtra is simply this. The Antaryâmî is not Brahma; because the Mâdhyandinas and the Kâ*n*avas both *learn* a distinction. The following is the translation of the Upanisad-texts quoted in this connection. “He, who abides in pre-eminent knowledge ( human spirit ), whose body is pre-eminent knowledge.” “He who abides in the soul ( Âtmâ ), + + there is none else that sees.” “ Because where there is the sense of duality, there one sees another, and where every thing has become to him the soul, there who is to see whom?” All these texts occur in the B*r*ihadâra*ny*aka.

21. The following Upanisad-texts are to be interpreted and adjusted. The sûtra simply states

रतात. पण सिद्धांत असा की परब्रह्माचे ते गुण. या विषयास अनुसरून शंकराचार्य असें म्हणतात की विद्या दोन प्रकारच्या, एक ब्रह्मविद्या आणि एक कर्मविद्या. ब्रह्मविद्येमध्यें ब्रह्माचें निरूपण आलें आहे. अशा या व्युत्पत्तीच्या धोरणावरून ब्रह्मविद्येची व्यवस्था करतात. जेथें ब्रह्माचें निरूपण नाही ती ब्रह्मविद्या नव्हे. ऋग्वेदादि जे ग्रंथ आहेत त्यांमध्यें कर्मविद्येचा उपन्यास केला आहे. कारण ब्रह्मविद्येची स्तुति होऊन तिचा उपक्रम व्हावा. असे निरूपण शंकराचार्य करतात, त्याचा वाचकांनीं विचार करावा. रामानुज असें म्हणतात की सृष्टीमध्ये दोन प्रकारचे आकार दिसून येतात. एक उत्कृष्ट म्हणजे पर आणि दुसरा निकृष्ट म्हणजे अपर. पर म्हणजे समष्टि, म्हणजे पुरुषच असें प्रसिद्ध आहे. त्याचा आधार धरून प्रकृति दुसऱ्या पदार्थास उत्पन्न करते. अशी सांख्य शास्त्राची परिनाळिका घेऊन ते असें सिद्ध करतात कीं प्रकृतिपासून पुरुष भिन्न, आणि त्या दोहोंचेंहि वर्णन उपनिषद्वाक्यांत नाहीं. एक पुरुषाचेंच वर्णन आहे. मध्वाचार्य असें म्हणतात कीं परा विद्या एक आणि अपरा विद्या दुसरी. परा उत्तम, आणि अपरा म्हणजे निकृष्ट. ह्या उत्तम विद्येनें हरिच जाणायाचा. या हरीच्या अंगी निर्गुणत्व, अदृश्यत्व, परमात्मत्व, श्रेष्ठत्व हे गुण आहेत. आणि याच्या योगानें हरि ओळखण्यास येतो. परा विद्येचा हाच विषय आणि हे सारे गुण विष्णूचे. वल्लभाचार्य म्हणतात की अदृश्यत्वादि गुण

that Brahma possesses the qualities described in the Upanisad-texts. An opponent asks—are they the qualities of the human spirit or of the Sânkhya-prakriti or of the Supreme Spirit? The conclusion is that they are the qualities of the Supreme Spirit. In this connection Shankarâchârya observes:—there are two systems—the spiritual system (Brahma-vidyâ) and the sacrificial system (Karma-vidyâ.) That is the spiritual system where Brahma or the Supreme Spirit is described; that is not the spiritual system in which it is not described. The sacrificial system or Karma-vidyâ is treated of in works like the Rig-veda, so that the spiritual system (Brahma vidyâ) may be commended and introduced. The reader can examine for himself this explanation of Shankarâchârya. Upon this sûtra Râmânuja remarks—two forms are seen in this universe—the highest and the lowest. The highest is the universal unlocalized Spirit (Samasti) or the Person (Purusa.) This is well-known. Supported by Him, the Prakriti produces phenomena. This is the way the Sânkhyas state the relationship between the two. Hence the Upanisads do not describe both—Prakriti and Purusa or the material, noumenal essence and spiritual God-head, the one being distinct from the other. They describe only the spiritual God-head. Madhvâchârya observes:—the highest knowledge is distinct from the lowest knowledge. Hari or God is to be known by means of the former. Hari is unqualified, invisible, Supreme Spirit, and he

परमात्म्याचे. परमात्मा म्हणजे परब्रह्म. परब्रह्माचें ज्ञान झालें की दुसऱ्या सर्व विषयाचें ज्ञान होतें. अशा रीतीनें ब्रह्म श्रेष्ठ आहे. म्हणूनच तत्संबंधी विद्या ही श्रेष्ठ आहे. आणि अक्षर म्हणजे ब्रह्म, आणि पुरुष म्हणजे जीव अशा रीतीनें त्या दोघांमध्यें, म्हणजे जीव आणि ब्रह्म यांमध्यें श्रेष्ठ आणि कनिष्ठ असें तारतम्य असून दोन्ही एकच आहेत. याचें नांव ब्रह्मवाद. आतां अक्षर म्हणजे जीव, ब्रह्म कसें ? त्याच्या अंगीं अदृश्यत्वादि गुण आहेत म्हणून तें परमात्माच, कारण या संबंधानें परमात्म्याचे धर्म वर्णिले आहेत. जसें अक्षरापासून विश्व उत्पन्न होतें. याप्रमाणें पुरुष म्हणजे ब्रह्मच आणि जीव म्हणजे ब्रह्मच; दोहोंमध्यें भेद इतकाच कीं जीवांतील सारा आनंद प्रकट नसतो. त्याचा पुष्कळ आनंद झाकून गेलेला असतो. ईश्वराचा सारा आनंद प्रकट असतो. अक्षर म्हणजे जीव, पुरुष म्हणजे परमात्मा. या संबंधानें जीं उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें— "नंतर जिच्या योगानें तें अक्षर (ब्रह्म) समजतें, ती उत्कृष्ट. पंडित तें पूर्ण पहातात. अदृश्य, अग्राह्य, ज्याला गोत्र नाहीं, ज्याला ब्राह्मणादि वर्ण नाहीं, ज्याला डोळे आणि कान नाहींत, ज्याला हात पाय नाहींत, तें नित्य, तें प्रभु, सर्व स्थळीं वास करणारें, तें अतिसूक्ष्म, तें कमी जास्त होत नाहीं. सर्व भूतांचें तें कारण." "जसा कोष्टी नांवाचा किडा उत्पन्न करतो आणि उपसंहार करतो, अशा पृथ्वीमध्यें वनस्पति उत्पन्न होता-

is to be known by these qualities. The highest knowledge explains this; and Visnu possesses these qualities. Vallabhâchârya states that the Supreme Spirit possesses such qualities as invisibility. The Supreme Spirit being known, all other things are known. Thus the Supreme Spirit is the highest, and, therefore, the system of knowledge about him is the highest. The term *Aksara* used in the Upanisad-texts refers to the Supreme Spirit and the term, Purusa, to the human spirit. Thus though there is an apparent distinction between the two—one being the highest and the other being the lowest,—yet both are really identical. This is styled the Brahma-vâda or the system of Brahma. How is the *Aksara* (or Brahma,) the human spirit? Because it possesses such qualities as invisibility, it is Brahma or the Supreme Spirit; because the qualities of the Supreme Spirit are described in this connection. For instance, the universe issues from the Aksara. Thus Personal God (Purusa) and the human spirit (Jîva) are both identical with the Supreme Spirit—the distinction between the two being that the human spirit is not able to enjoy all the happiness it is capable of; most of its happiness lies dormant, on account of its being subject to Upâdhi or the condition of mundane existence; while God enjoys all the happiness possible. The term Aksara in the sûtra signifies the human spirit, and the term, Purusa, the Supreme Spirit. The following is the translation of the Upanisad texts connected with this sûtra. "Then that learning by means

त, जसी जीवंत मनुष्यावर केश आणि लव उत्पन्न होते, तसें अक्षरा (ब्रह्म)-पासून हें विश्व उत्पन्न होतें. अक्षरा-(ब्रह्मापासून) पलिकडे श्रेष्ठ पुरुष." "जो सर्व सामान्येंकरून जाणणारा, जो सर्व विशेषेंकरून जाणणारा, ज्याचें ज्ञानात्मक तप, त्यापासून हें ब्रह्म (शबल ब्रह्म) आणि नामरूप, आणि अन्न उत्पन्न होतें. ज्या ज्ञानानें अक्षर पुरुष आहे असें जाणतो, खरीच ती ब्रह्मविद्या तत्त्वदृष्टीनें सांगता झाला. हे भगवान्, काय जाणल्यानें हें सर्व जाणलें जातें. जी सर्व विद्येची मूळस्थान, ती ब्रह्मविद्या ज्येष्ठ पुत्र जो अथर्व त्यास तो सांगता झाला." "हे नाश होणारे, (हे) अशक्त, अठराजण (सोळा ऋत्विज, यजमान, आणि त्याची बायको) यज्ञरूपानें दृष्टीस पडतात. त्यांतील (जें) कनिष्ठ कर्म (तें) हें श्रेष्ठ, असें मानून आनंद पावतात. ते मूर्ख, पुनरपि जरा मृत्यूप्रत पावतात." "कर्मेंकरून उत्पन्न झालेल्या लोकांची परिक्षा करून ब्राह्मणानें वैराग्य घ्यावें. जें केलेलें, त्यानें जें न केलेलें तें (मिळत) नाहीं. तें विशेष समजण्याकरितां हातामध्यें समिधा घेऊन त्यानें गुरूपाशी जावें. (तो) गुरु श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ." या उपनिषद्वाक्यांमध्यें अक्षर या पदाच्या अर्थाविषयीं भानगड आहे. त्याचा वाचकांनीं विचार करावा.

of which the Aksara (Brahma) is known, is the highest. Pandits see this fully. That is eternal which is invisible, which is incomprehensible, which has no relation of consanguinity (Gotra), without any distinction of colour such as that of a Brâhmana, which has neither eyes nor ears, which has neither feet nor hands. It is the power. It abides in all places. It is highly ætherial; which never increases nor decreases, and which is the cause of all existence (Bhûta)." "As a spider creates and destroys its cobwebs, as plants spring up upon the face of the earth, as hair and down grow on a living man, so this universe emanates from the Aksara (Brahma). The Highest Person is beyond this Aksara (Brahma)." "From Him, who knows all things generally, and who knows all things particularly, whose austerity consists in knowledge—from Him this Brahma (shabala Brahma or gross Brahma), these names, and forms and food proceed. He indeed explains the spiritual system (Brahma-vidyâ) by means of his vision of essences, by which* he knows that Aksara (Brahma) is the Person; Lord, what when known, is all known? He explains to Atharva, his eldest son, that spiritual system (Brahma-vidyâ) which is the foundation of all knowledge." "This is destructible, incapable,—eighteen persons (sixteen officiating priests, a sacrificer, and his wife) appear in the form of a sacrifice and enjoy themselves, believing the lowest to be the highest activity. These fools become again subject to old age and death." "A Brâhmana

सूत्राणि.

विशेषणभेदव्यपदेशाभ्यां च नेतरौ ॥ २२ ॥

भावार्थः । अनुसंहितानुसंधास्यमानेषु वाक्येषु विशेषणैर्भेदव्यवहारेण च यो निर्दिष्टः स परमात्मा न शारीरो जीवो न वा प्रकृतिः । उपनिषद्वाक्यानि गृहीत्वा प्रकृतिर्निर्दिष्टेति सांख्या वदंति ॥ लौकायतिकाश्च शारीरो जीव इति । तदप्यसत् । किं कारणं । विशेषणानां भेदव्यवहारस्य चान्यथा व्यवस्था न भवेत् ॥ तत्रऽपरं त्वक्षरं या सा प्रकृतिः जडरूपा । श्रीः परा प्रकृतिः प्रोक्ता चेतना विष्णुसंश्रया । तामक्षरं परं प्राहुः परतः परमक्षरं । हरिरेवाखिलगुणमक्षरत्रयमीरितमिति स्कांदे इति मध्वः ॥ अक्षरादव्याकृतात् परो यः पुरुषस्तस्मादपि परभूतोऽदृश्यत्वादिगुणकोऽक्षरशब्दाऽभिहितः परमात्मेत्यर्थ इति रामानुजः ॥ ब्रह्मवादे पुनः सर्वभवनसमर्थत्वाद् ब्रह्मणि विरोधाभावः । न हि नित्यं सदैकरूपमविक्रियमाणं च भवितुमर्हति । सर्वं ब्रह्मधर्मतुल्यत्वे तदेव ब्रह्मेति जितं ब्रह्मवादिभिः । यः सर्वज्ञः सर्वविदित्यादयस्तु सुतरामेव न प्रकृतिधर्मा इति वल्लभः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः स बाह्याभ्यंतरो ह्यजः । अप्राणो ह्यमना: शुभ्रो ह्यक्षरात् परतः परः । मुं० उ० ( २.१,२.) ॥

ought to accept asceticism after examining all the regions produced by sacrificial activity (karma); what is not fashioned (krita) is not obtained by means of that which is fashioned. Taking sacrificial fuel in his hands, one should go to his teacher to know this particularly—a teacher well-versed in the Vedic lore (shrotriya) and devoted to the con-